# पांढरपेशांचें जग

( कथासंग्रह )



लेखक

श्री. ज. जोशी, बी.



जून ] किंमत १।। रुपया [ १९४५

# दोन शब्द

प्रस्तुत कथासंग्रहास 'पांढरपेशांचें जग' हें नांव मुद्दाम नि हेतुपूर्वक दिलें आहे. माझ्या लहानपणापासून मी पुण्यांतील पांढरपेशांचे जगांत वावरत आहें, व तेथील वातावरण आणि त्यांत निर्माण होणाऱ्या अनेकविध घटना उघड्या डोळ्यांनी बघत आहे. सदाशिव, नारायण, अगर शनिवार या पेठांतील जुनाट अंधकारमय पेशवाईवाड्यांत जन्मलेल्या आणि कारकुनी अगर मास्तरकीच्या तुटपुंज्या मिळकतीवर सांस्कृतिक जीवन व्यतीत करूं पाहणाऱ्या पांढरपेशा तरुणांच्या हृदयांत ज्या तऱ्हेचे विचार उद्‌भवतात, व जे विकार बळावतात ते सर्व मी माझ्या लघुकथांतून चित्रित केले आहेत. एका दृष्टीने पांढरपेशा तरुणांचें मानसिक चित्रण करणें कठीण आहे. श्रीमंती आणि गरिबी या दोन टोकांमध्यें तो नेहमी त्रिशंकूप्रमाणे लोंबकळत असतो. तो श्रीमंत बंगलेवाला नसतो, पण सुंदर बंगले, नाजुक तरुणी, गोड–प्रणयरम्य भावगीतें, प्रथमदर्शनीं उद्भवणारें प्रेम, आणि एकंदर विलासी जीवन, यांचीं मनोहर स्वप्नें त्याच्या दृष्टीसमोर सारखीं नाचत असतात. तो धड गरिबहि नसतो, पण उपासमारीची आणि बेकारीची भुतें त्याचा नेहमी पाठपुरावा करीत असतात. त्याला श्रीमंतीची हौस असते, पण तो कधीच श्रीमंत होत नाही. श्रमजीवी दलितवर्गाविषयी त्याला नेहमी तिटकारा वाटत असतो, पण परिस्थिति त्याला नेहमी त्या वर्गाकडे खेचत असते. अशा विचित्र नि अवघड परिस्थितीत वाढलेल्या या समाजाचें चित्रण करण्याचाप्रयत्न या पुस्तकांतील लघुकथांत केला आहे. प्रयत्न कितपत साधला आहे, हें ठरविण्याचें काम अर्थातच वाचकांचें आहे.

मात्र येथे हें मुद्दाम सांगितलें पाहिजे, की गेल्या कांही वर्षांत या वर्गांतहि झपाट्याने बदल होत आहे, याची जाणीव मला आहे. 'उपेक्षितांचें अंतरंग' या गोष्टींतील 'अप्पा' पांढरपेशांच्या पटावरून आज नाहीसा होऊं लागला आहे. युद्धपरिस्थितीमुळे सामाजिक जीवनांत विलक्षण फेरफार होत आहेत. आर्थिक हलाखी वाढत आहे, व जुनीं मूल्यें आणि जुने विचार, साऱ्या जीवनाला ग्रासून टाकणाऱ्या या युद्धामुळे भडाडून कोसळत आहेत. हल्लीचा पांढरपेशा समाज, मीं लिहिलेल्या गोष्टीपेक्षां किती तरी बदललेला आहे. आपण कोणी तरी "महान् लेखक, पुढारी,, अगर वक्ते व्हावें, अशीं खोटीं

मनोराज्यें हल्लीचे तरुण जीवनाच्या आरंभाला करीत नाहीत. आणि त्यामुळेच 'आकांक्षांचीं भुतें' या गोष्टींत वर्णन केल्याप्रमाणे त्यांची दारुण निराशा होण्याचा प्रसंगहि सहसा त्यांच्यावर येत नाही. आजच्या शिक्षकाच्या आवाजांत 'आकांक्षांचीं भुतें' या गोष्टींत काणे मास्तरांचा आवेश नाही; कारण 'उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः' या वचनाबद्दल त्याला आत्मीयता नाही. या लघुकथांत वर्णिलेला मध्यमवर्ग फार तर तीस ते पसतीस सालापर्यंत हयात होता. त्यानंतरच्या बदललेल्या मध्यमवर्गाचें चित्रण येथें आलें नाही, हें अत्यंत नम्रपणाने नमूद करतों. वाचकांनी याच दृष्टीने प्रस्तुत संग्रह वाचावा अशी विनंति आहे.

आपण 'लेखक' व्हावें, अशी हौस मला फार दिवसांपासून आहे; पण 'ग्रंथकार' होण्याचा योग माझ्या आयुष्यांत कधी येईल, असें मला वाटत नव्हतें. मराठींतील प्रसिद्ध लेखक श्री. वि. वि. बोकील यांनी जर माझी श्री. दयार्णव कोपर्डेकरांशीं गाठ घालून दिली नसती, आणि माझ्यासारख्या नवशिक्या लेखकास ग्रंथकार करण्याचें धैर्य श्री. कोपर्डेकरांनी दाखविलें नसतें तर प्रस्तुत 'दोन शब्द' लिहिण्याचा योग कधीच आला नसता. माझे मित्र श्री. ज. वा. भिडे यांनी जर एका विशिष्ट तऱ्हेने मला मदत केली नसती, तर हें पुस्तकच प्रकाशित झालें नसतें. श्री. बोकील, कोपर्डेकर व भिडे या तिघांचेहि मी मनःपूर्वक आभार मानतों. आणखी आभार खूपच मानावयास पाहिजेत; पण कागद-टंचाईच्या या दिवसांत तो अत्याचार मी करीत नाहीं. तरी पण अगदीच राहवत नाही म्हणून, माझ्या गोष्टींना आपल्या लोकप्रिय मासिकांत स्थान देऊन मला थोडीफार प्रसिद्धि मिळवून देणाऱ्या श्री. शंकरराव किर्लोस्कर यांचे व माझ्यांत लेखनाचा थोडाफार अंश आहे हें दिसतांच प्रथमपासून मला समाजवादी दृष्टिकोन देण्याचा यत्न करणारे कॉ. भाऊ फाटक यांचे मी आभार मानतों. त्या दोघांचे आभार मीं न मानले, तर माझ्यावर कृतघ्नपणाचा दोष नक्की येईल.

या लघुकथा म्हणजे अमर वाङ्मयाचा भाग आहे, असें मला कधीच वाटलें नाही. माझ्याप्रमाणेच त्याहि नश्वर आहेत. एखाद्या टीकाकारास लक्ष देणाऱ्या लायकीच्या या गोष्टी वाटल्याच, तर त्याने लेखकाची वर सांगितलेली भूमिका लक्षांत ठेवावी.

---

ती. आई व ती. बाबूराव

यांस

नम्रतापूर्वक अर्पण

कारण

त्यांच्याशिवाय दुसरें कोण कौतुक करणार !

— किसन

# आमचें प्रकाशन

### साने गुरुजी

| | |
|---|---|
| तीन मुलें | २॥ |
| क्रांति | ३ |
| स्त्रीजीवन भाग १ | १॥ |
| ,, २ | १। |
| राष्ट्रधर्म | २ |
| समाजधर्म | १॥ |
| मुलांसाठीं फुलें | ·।· |

### वि. स. खांडेकर

| | |
|---|---|
| समाधीवरलीं फुलें | २ |

### वि. वि. बोकील

| | |
|---|---|
| आबा | २॥ |
| जलधारा | १॥ |
| मंगळागौरीच्या रात्रीं | २॥ |
| मीना-नीना | १। |
| अत्तराचे दिवे | १॥ |
| दुसरी सावली | २॥ |
| बोकिलांच्या गोष्टी | १। |
| गारांचा वर्षाव | १॥ |

### राजरत्न जोशी

| | |
|---|---|
| स्त्रियांचे हक्क | ·॥· |
| विवाहितांचें नंदनवन | १॥ |
| अविवाहितांचे प्रश्न | १। |

### द. रा. कानेगांवकर

| | |
|---|---|
| मराठीचिये नगरीं | ·॥।· |

### ग. ल. ठोकळ

| | |
|---|---|
| कडू साखर | १॥ |
| मीठभाकर | १ |
| सुगी | १। |

### के. नारखेडे

| | |
|---|---|
| शिवार | १ |
| काव्यकलेचें अंतरंग | २ |

### ना. धों. ताम्हनकर

| | |
|---|---|
| माईची माया | १ |
| बोलघेवड्या | ·॥।· |

### पु. पां. गोखले

| | |
|---|---|
| आगरकर-चरित्र | ·॥· |

### मा. भ. नंदुरकर

| | |
|---|---|
| मानलेलीं मुलें | १ |

### पंडित सप्रे

| | |
|---|---|
| अर्धचंद्र | ·॥।· |

### दा. पां. रानडे

| | |
|---|---|
| लाल माणकांची गोष्ट | ·।· |
| मायाबाजार | ·।· |

### आचार्य कालेलकर

| | |
|---|---|
| समाज आणि समाजसेवा | १ |

### अनंत काणेकर

| | |
|---|---|
| जागत्या छाया | २ |

### श्री. ज. जोशी

| | |
|---|---|
| पांढरपेशांचें जग | १॥ |

प्रकाशक : द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव पेठ, पुणें २.

# आकांक्षांचीं भुतें : १ :

बोलून चालून मी एक दुबळा शाळामास्तर! मला अशीं किती पत्रें येणार? आमच्या नातेवाइकांपैकीं एखाद्या वृद्ध नातेवाइकानें या जगाला रामराम ठोकला, किंवा दुसऱ्या एखाद्या नातेवाइकानें संसाराचा शकट सुरू करण्याचें मनांत आणलें, तरच पोस्टखात्याला आमच्यासारख्या दरिद्री शाळामास्तरांची आठवण व्हायची! मला या दोन प्रसंगांखेरीज कोणाचीच पत्रें येत नव्हतीं, आणि त्यामुळें एखादें पत्र पोस्टमननें घरांत टाकलेंच, कीं त्याचा मायना, आणि त्यांत वर्णिलेले प्रसंग मला अगदीं तोंडपाठ असत.

त्या दिवशींही असाच पोस्टमनच्या वेळेला सुन्न व निराश होऊन बसलों होतों मी! सर्व सृष्टीवर विषण्णता व दुःख यांचें साम्राज्य पसरलें होतें. सूर्यकिरणांपासून चैतन्याचा आणि आनंदाचा लाभ होत नव्हता, आकाशाचा नेहमींचा भव्यपणा लोपल्यामुळें, आकाश एखाद्या भुताटकीनें भारलेल्या अजस्र राजवाड्याप्रमाणें भकास दिसत होतें; आणि आकाशांत इकडे तिकडे भटकणारे काळेकुट्ट मेघपुंज, पडक्या वाड्याच्या जमिनीवरून काळसर्पानें सरपटत जावें, त्याप्रमाणें भीतिप्रद वाटत होते.

मी असा विषण्ण होऊन किती वेळ बसलों होतों कुणास ठाऊक; पण माझी ती तन्द्री आमच्या पोस्टमनच्या चिरक्या आवाजांत ओरडलेल्या माझ्या नांवानें भंग पावली. मीं वर बघितलें तर माझ्या नांवाचें एक जाड लठ्ठ पाकीट पडलेलें होतें.

त्या पाकिटावरचें अक्षर माझ्या ओळखीचें नव्हतें. ऑफिसांतल्या एखाद्या सराईत कारकुनानें अक्षर काढावें, त्याप्रमाणें तें अक्षर होतें.

मीं पाकीट उघडलें व थोडेंसें वाचल्याबरोबर एकदम चपापलों. तें पत्र आमच्या जुन्या शाळेच्या हेडमास्तरांकडून आलें होतें.

आमची जुनी शाळा! ती शाळा सोडून मला दोन तपांवर काळ लोटला होता. आणि त्या अवधींत मीच जगाच्या शाळेंत, एक निरुपद्रवी आणि नापास विद्यार्थी ठरलों होतों. या अवधींत संकटांशीं, निराशांशीं आणि दारिद्र्याशीं मला इतकें झगडावें लागलें होतें कीं, मला आमच्या जुन्या शाळेबद्दल विचार करण्यास सवडच नव्हती. आणि आमच्या शाळेनें माझी चौकशी करण्याइतका मी महत्त्वाचा माणूस नसल्यामुळें, मला शाळेबद्दल या दोन तपांचे अवधींत एक अक्षरसुद्धां कळलें नव्हतें. आणि इतक्या दिवसांनंतर एकदम हें पत्र. काय लिहिलें होते त्या पत्रांत?

त्या पत्रांत लिहिलें होतें—

"आमच्या शाळेंतून मॅट्रिक झालेल्या अगदीं पहिल्या विद्यार्थ्यांपैकीं आपण आहांत. आपल्या शाळेनें आजपर्यंत विद्यादानाच्या पवित्र क्षेत्रांत किती आघाडी मारली आहे हें आपणांस अवगत असेलच. या आपल्या शाळेला आज ५० वर्षें पूर्ण होत असल्यामुळें आम्हीं समारंभ करण्याचें योजिलें आहे. तरी त्या समारंभास आपली अवश्य उपस्थिति व्हावी."

पत्राच्या खालची सही बघून तर मला विस्मयाचा जबरदस्त धक्का बसला. ती सही, आमच्या कीर्तिकर हेडमास्तरांची होती. आम्ही शाळेंत असतांना आम्हाला कीर्तिकर हेडमास्तर होते, पण मीं दोन-चार वर्षांपूर्वीं त्यांच्या मृत्यू-बद्दलची खात्रीची बातमी ऐकली होती. मग त्यांची सही त्या कागदावर कशी? मला विचार पडला, कीं ही काय भुताटकी!

पण मला विचार करण्यास मुळींच अवसर नव्हता. समारंभाची वेळ होत आली होती. त्यामुळें मी कपडे करून एकदम घराबाहेर पडलों.

आमच्या लहानपणीं, शाळेंत जाणारे विद्यार्थी असतांना, मी असाच लगबगीनें घराच्या बाहेर पडत असें. पण त्या वेळच्या माझ्या आकृतींत आणि माझ्या मनांत, माझ्या हल्लींच्या स्थितीपेक्षां किती भयंकर फरक होता.

हल्लीं माझें शरीर निराशेनें व दारिद्र्यानें पोखरून निघालें आहे, आणि त्या शरीरांत वास करणारें मन, आतां या जगांत रहावयास कंटाळलेलें आहे. तें मन आतां कोणाची आशा करूं शकत नाहीं, आकांक्षांना रहावयास माझ्या हल्लींच्या मनांत तिळमात्र जागा नाहीं.

पण पंचवीस वर्षांपूर्वीचें माझें शरीर! त्यावरची ती तेजस्वी कांति, ते हास्यानें भरलेले डोळे, ती अवखळपणाची वागणूक आणि त्या शरीरांत वास करणारें ते जिवंत मन! त्या वेळीं, त्या मनाला, जग म्हणजे एक रम्य क्रीडोद्यान वाटायचें. काय त्या वेळच्या आशा आणि महत्त्वाकांक्षा. त्या वेळीं, आमच्यापैकीं प्रत्येकाला जगांत बडा मनुष्य म्हणून मिरवायचें होतें. मास्तर, कारकून, मोटार ड्रायव्हर, किंवा टांगेवाला व्हायला कुणीच तयार नव्हते. बहुतेक सर्व यशस्वी डॉक्टर किंवा बॅरिस्टर होणार होते; मी निरनिराळे देश आणि समाज हिंडणारा लेखक होणार होतों. पण कालप्रवाहांत सांपडून माझ्या आयुष्याचा एक शाळामास्तर झाला होता. आतां त्या वेळच्या आकांक्षांची आठवण झाली की हंसूं आल्याशिवाय रहात नाहीं.

रस्त्यानें चालतांना लहानपणचे ते सर्व विचार मला भेडसावीत होते. माझी मर्मभेदक चेष्टा करण्याचें काम ते चोख बजावीत होते.

माझ्याबरोबरच मला माझे इतर मित्र आठवले.

तो अविनाश पटवर्धन! पटवर्धन वकीलांचा एकुलता एक मुलगा, म्हणून काय लाड व्हायचे त्याचे त्या वेळीं. पटवर्धन वकीलांकडून शाळेला देणगी मिळाली असल्यामुळें, त्याला शिक्षा करण्याची कुणाची छाती नव्हती. अत्यंत दांडगा व खोडकर मुलगा होता तो त्या वेळीं. आतां तो आमच्या गांवचा पुढारी म्हणून मिरवीत आहे. लांब सफेद नेहरू शर्ट घातलेला सदैव तोंडांत चिरूट पेटवलेला, असा मोटारींतून जातांना मी त्याला अनेक वेळां बघतों.

आणि ती पुष्पा परांजपे, श्रीमंत बापाची एकुलती एक मुलगी, म्हणून शाळेंतल्या प्रत्येक मुलाला माहीत होती ती. आतां कुठें असते कुणास ठाऊक! आणि ती कावेरी कुलकर्णी–कुलकर्णी मास्तरांची मुलगी होती ती. काय चिमखडी आणि हुशार होती त्या वेळीं! नेहमीं बिचारी अभ्यासांत आणि वाचनांत गुंग! हल्ली भेटली नव्हती ती बरेच दिवसांत.

परंतु मला हे विचार संपवावे लागले. कारण शाळेची भव्य इमारत दिसूं

लागली होती. शाळेच्या इमारतीची शोभा वाढविण्याचा पुष्कळ प्रयत्न करण्यांत आला होता; परंतु मला तरी ती उदास दिसत नव्हती. सर्व वातावरणच भकास होतें. कुणी तरी दुःखानें हुंदके द्यावे असे आवाज कानांवर येत होते.

शाळेच्या दरवाजापाशीं कीर्तिकर हेडमास्तर उभे होते. इतके दिवसांनीं मीं त्यांना बघितलें असलें, तरी मीं त्यांना ओळखलें लगेच. तोच लांब काळा कोट, तोच पांढरा शुभ्र रुमाल, तीच एका हातानें दुसरा हात उगीचच चोळण्याची लकब. पण ते उंच किती दिसत होते; डोळे काचेच्या भिंगाप्रमाणें निर्जीव दिसत होते, गाल किती बसले होते. आणि त्यांच्या ओठांतून त्यांची वरची कवळी बाहेर पडली होती. ती भयप्रद दिसत होती.

मी जवळ गेल्यावर नेहमींप्रमाणें त्यांनीं माझा हात दाबला. किती गार लागला त्यांचा हात! त्यांचीं बोटेंसुद्धां माझ्या बोटांना कांहीं विलक्षण तऱ्हेनें टोचलीं.

माझ्या शंकेचें निरसन करून घेण्याच्या उद्देशानें मीं म्हटलें, “सर, मी तर तुमच्याबद्दल असें ऐकलें होतें कीं...”

मला मध्येंच थांबवून ते आपल्या घोगऱ्या आवाजांत म्हणाले “आंत जा, आणि स्वस्थ उभा रहा; सर्व कांहीं कळेल तुला.”

मी शाळेच्या आवारांत शिरलों, तर तेथें आमच्या वेळचे सर्व मास्तर एका रांगेंत उभे होते. त्यांच्या चेहऱ्यावरची सर्व कांति लोपून गेली होती, केसांचा पांढरेपणा कांहीं विलक्षण तऱ्हेनें भयानक वाटत होता, त्यांचे पाय थरथरत होते; आणि बहुतेकांच्या माना पुढें कललेल्या होत्या.

त्याच घोळक्यांत आमचे लाळे मास्तर उभे होते. त्यांना मीं विचारलें, “सर, ही काय भानगड आहे? तुम्ही सर्व असे स्तब्ध कां उभे?”

त्यावर त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. मीं पुन्हा विचारलें, “मी एकटाच आलों आहे कीं काय? अविनाश कुठें आहे? पुष्पा, गोदावरी या नाहीं का आल्या?”

लाळे मास्तर आपल्या घोगऱ्या स्वरांत म्हणाले, “तिथें उभा रहा मुकाट्यानें. सर्व कांहीं कळेल तुला.”

मी तिथेंच एका कोपऱ्यांत विमनस्कपणें उभा राहिलों.

थोड्या वेळाने लोक येण्यास सुरवात झाली.

प्रथम 'अविनाश' आला मोटारीतून. त्यानें स्वच्छ नेहरू शर्ट घातला होता; खाडीच्या पांढऱ्या टोपीची कड प्रामुख्यानें पुढें दिसत होती, तोंडांत बेफिकीरपणानें ठेवून दिलेला चिरूट होता, शाळेंत असतांना उजव्या कमरेवर हात देऊन ऐटींत चालण्याची त्याची लकब अजून कायम होती.

पण इतक्यांत दुसरीकडून एक पोक्त रोगट स्त्री येत होती. तिचे डोळे निस्तेज दिसत होते, शरीर बेडौलपणानें सुटलें होतें. तिच्या अंगावर एक रोगट किरकिरें मूल होतें, आणि मागून दोनतीन अशक्त मुलें चालत होतीं.

ती जवळ येतांच मीं तिला ओळखली. ती कावेरी कुलकर्णी होती. काय फरक पडला होता तिच्यांत! वीस वर्षांपूर्वीची तिची हुशारी कुठें नष्ट झाली होती?

इतक्यांत पुष्पा एका मोटारीतून उतरली. शाळेंत असतांना जें हास्य तिच्या चेहऱ्यावर होतें, तेंच अजून तिथें कायम होतें. तेच खोडकर डोळे, आणि तीच उजव्या हातानें केस मागें सारण्याची लाडकी लकब!

पण इतक्यांत सर्व शाळाच आमच्या वेळच्या मुलांनीं भरून गेली. काय विचित्र घोळका दिसत होता तो! किती निर्जीव व भेसूर दिसत होते त्यांपैकीं कांहीं लोक!

मीं त्या कित्येकांना ओळखले. तो जोशी—लहानपणीं केसरीचा संपादक होण्याची महत्त्वाकांक्षा होती त्याची. तो एखाद्या बावळ्या शाळामास्तराप्रमाणें उभा होता तिथें. तो पाध्ये—सायकलवरून सर्व जगाची प्रदक्षिणा करण्याचा बेत होता त्याचा, तो एखाद्या कारकुनाप्रमाणें उभा होता.

पण इतक्यांत कीर्तिकर हेडमास्तर आलेच आमच्याजवळ. ते म्हणाले, "मुलांनो, माझ्या बोलावण्याप्रमाणें आज तुम्ही आलांत ही फार चांगली गोष्ट केलीत; समारंभ योग्य वेळीं सुरू होईलच. पण त्याअगोदर मी तुम्हांस एक अभिनव प्रयोग दाखविणार आहें. तो बघण्याकरितां माझ्या मागोमाग या."

"प्रयोग! कसला प्रयोग?" संपादक जोशी ओरडून म्हणाला.

"थांब, घाई करूं नको. सर्व कांहीं कळेल तुला." लाळे मास्तर घोगऱ्या आवाजांत उद्गारले.

हेडमास्तर पुढें चालत होते. त्यांच्या पाठोपाठ सर्व मास्तर, आणि नंतर आम्ही सर्व मुलें भुताटकीनें भारल्याप्रमाणें चाललों होतों. शाळेची इमारत भयंकर भकास दिसत होती, आणि इमारतीच्या भिंतींतून कुणाच्या तरी केविलवाण्या किंकाळ्यांचे आवाज कानांवर येत होते.

" कोण रडतें आहे, इतकें कळवळून ?" मीं, माझ्या उजव्या हाताला जोशी चालला होता, त्याला, विचारलें.

जोशीच्या डोळ्यांत कसली तरी चमक चमकून गेली. तो म्हणाला, " या शाळेंत शिकून गेलेल्या विद्यार्थ्यांचे आत्मे या भिंतींत पुरले गेले आहेत ते रडत आहेत. किंकाळ्या फोडीत आहेत."

मला त्याच्या बोलण्याचा कांहींच अर्थ कळला नाहीं.

आम्ही सर्व जिना चढून वर गेलों, तर शेवटच्या वर्गांतून कुणी तरी व्याख्यान दिल्याचा आवाज कानांवर येऊं लागला. मला आठवलें कीं आम्ही मॅट्रिकमध्यें असतांना तोच आमचा वर्ग होता.

आम्ही सर्व वर्गांत शिरलों, तर कुणी तरी एक मास्तर मुलांना शिकवीत होते. त्यांच्याकडे बघितल्यावर लगेच मीं ओळखलें, कीं ते आमचे काणे मास्तर होते म्हणून. अगदीं तसेच दिसत होते ते. तोच जुनाट मळका कोट, मुडपलेली तपकिरी रंगाची टोपी, निराशेनें भरलेले डोळे, बोलतांना टेबलावर हात मारण्याची नेहमींची लकब, आणि हातावरच्या त्या जाड हिरव्या दृग्गोचर होणाऱ्या शिरा—कशांत म्हणून बदल नव्हता ! फक्त चेहऱ्यावरील निराशेचे रंग जास्त गडद झाले होते, इतकेंच.

काणे मास्तर मराठी शिकवीत होते.

" अब्राहॅम लिंकन हा फार मोठा मनुष्य होऊन गेला. त्यानें जगतांतील गुलामगिरी नष्ट केली. गुलामगिरी म्हणजे दास्य—पिढ्यान्‌पिढ्या टिकणारें दास्य. गुलामांची दास्यांतून मुक्तता होत नसे.

परंतु हल्लीं जगांत तसें नाहीं. हल्लीं कोणीही गुलाम नाहीं. आपली स्थिति सुधारण्याचें हल्लीं सर्वस्वी माणसाच्या मनांत आहे. माणसानें उद्योग केला, तर दारिद्र्याच्या खाईंत पडलेला माणूस वैभवाच्या उच्च शिखरावर जाईल."

वर्गांत भयंकर शांतता होती. त्यामुळें काणे मास्तरांचा चिरका आवाज जास्तच भयाण वाटत होता. ते म्हणाले, " म्हणून तुम्ही आतांपासून एखादें

ध्येय, एखादी महत्त्वाकांक्षा डोळ्यांपुढें ठेवा; व ती साध्य होण्यासाठीं, उद्योग करण्यास सुरवात करा. **उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः**—"

"तूं सांग पुष्पा याचा अर्थ—"

"पुष्पा! या वर्गात कुठली पुष्पा आली?" मीं चमकून मुलींच्या बाकाकडे बघितलें तों काय आश्चर्य! तीस वर्षांपूर्वी आमच्या वर्गांत जशी पुष्पा होती, तशी ती तेथें बसलेली होती. तेंच जरीकांठी पांढरें शुभ्र पातळ, तोच गुलाबी रंगाचा ब्लाऊज आणि उजव्या तळव्यांत हनुवटी ठेवून बसण्याची तीच लाडकी लकब!

तीस वर्षांपूर्वीची पुष्पेची आकृति इथें कुणी जपून ठेवली. मग आमच्या आकृति कुठें आहेत? तीस वर्षांपूर्वीच्या माझ्या आकृतीचें काय झालें? का ती माझ्या मास्तरकीच्या शरीरांत पार पुरली गेली!

मीं चमकून सर्व वर्गाकडे बघितलें तों काय आश्चर्य! तीस वर्षांपूर्वीचा आमचा सातवीचा वर्ग कुणी तरी जसाच्या तसा जपून ठेवला होता. तो बघा अविनाश! वहीवर कांहीं तरी लिहीत आहे. मला माहीत आहे, कीं तो काणे मास्तरांचें चित्र काढीत आहे. ती कावेरी—काय चुणचुणीत दिसत होती ती. मास्तरांचा प्रत्येक शब्द किती तन्मयतेनें उतरून घेत होती. तो जोशी, आणि तो मी—तिसऱ्या बाकावरून पुष्पा परांजपेकडे बघत होतों.

इकडे काणे मास्तरांचें प्रवचन चाललेंच होतें. "म्हणून **उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः** याचा अर्थ उद्योगी मनुष्य संपत्ति मिळवतो—त्याच्याच आकांक्षा पूर्ण होतात."

पण इतक्यांत आमचे कीर्तिकर हेडमास्तर काणे मास्तरांपाशीं जाऊन ओरडले, "मूर्ख आहेस तूं. लबाड आहोंत आपण सारेजण. आज पिढ्यान्‌पिढ्या या उद्योगाची आणि महत्त्वाकांक्षांची पोपटपंची करून आपण लोकांच्या डोळ्यांत भरमसाट धूळ फेकत आहोंत."

मीं इकडे तिकडे बघितलें, तर आमच्या लहान आकृति, मुकाट्यानें लिहून घेत होत्या, अविनाशचें चित्र काढण्याचें काम जोरांत चाललें होतें. आमच्या मोठ्या आकृति या सर्व प्रकाराकडे कुतूहलपूर्वक बघत होत्या. अविनाशनें आपल्या तोंडांतला चिरूट विझवला होता, आणि पुष्पानें क्षणभर कपाळावर

केसांना वास्तव्य करण्याची परवानगी दिली होती. काणे मास्तर स्तब्ध होते. फक्त त्यांच्या डोळ्यांत निराशेचें पाणी कांठोकांठ भरत चाललें होतें.

कीर्तिकर हेडमास्तर आमच्याकडे वळून म्हणाले, “ मुलांनो, औद्योगिक आणि महत्त्वाकांक्षांच्या पूर्तीची खोटी पोपटपंची करून आम्ही तुम्हांला पिढ्यान्‌पिढ्या फसवीत आहोंत. उद्योगाला किंमत नाहीं, महत्त्वाकांक्षांना तर त्याहूनहि नाहीं. हल्लींच्या जगांत सर्वत्र कंपूशाही आहे. माणसानें कितीही प्रयत्न केला तरी त्याला ठराविक मर्यादेबाहेर जाणें शक्य नाहीं.”

काय भेसूर दिसत होते ते त्या वेळीं ! त्यांची उंची जास्तच वाढली होती. डोळ्यांत कसल्या तरी दारुण विषादाची चमक दिसत होती. “ म्हणून माणसांनीं जगांतली कंपूशाही हाणून पाडण्याचा प्रयत्न केला पाहिजे, नाहीं तर...”

इतकें बोलून ते लहानग्या अविनाशजवळ गेले. “ नाहीं तर तुमच्या पिढीची जशी स्थिति झाली, तशीच पुढच्या पिढ्यांची होईल. हल्लींच्या जगांत, उद्योगावर आणि कर्तबगारीवर मोठेपणा नसतो. उदाहरणार्थ, हा अविनाश...

इतकें बोलून त्यांनीं अविनाशची मानगूट धरून त्याला वर उचललें, “ होती का याच्यांत बुद्धिमत्ता ! श्रीमंत बापाचा एकुलता एक पोरगा म्हणून शाळेंत आम्ही याचें कौतुक करीत होतों. पण हा काय अभ्यासू होता, आयुष्यांत पुढें येण्याकरितां झटत होता ? छे. पण हा तुमच्याबरोबर मॅट्रिक पास झाला, बापाची श्रीमंती असल्यामुळें, पांचसहा वर्षं कॉलेजमध्यें राहून पदवी न घेतां परत आला, पण आतां याचें काय झालें आहे...

त्यांनीं एकदा लहानग्या अविनाशकडे बघून, त्याला वर उचललें; व ते म्हणाले, “ वडिलार्जित इस्टेटीमुळें गांवांतील झब्बूमध्यें याची गणना झाली; आणि असें म्हणून त्यांनीं हातांतल्या अविनाशला दूर अंतराळांत भिरकावला. तों काय आश्चर्य, तो लहानगा अविनाश वितळून जाऊन, त्याच्या जागीं स्वच्छ नेहरू शर्ट घातलेले, आमच्या गांवाचे पुढारी अविनाश हे उभे राहिले.

‘दुसरें उदाहरण घ्या.’ असें म्हणून ते गोदावरीपाशीं आले. गोदावरी जोरांत लिहून घेत होती. तिला वर उचलून ते म्हणाले, “ तीस वर्षांपूर्वी तुमच्या वर्गांतील मन लावून अभ्यास करणाऱ्या या मुलीच्या आकांक्षा काय होत्या, हें माहीत आहे ? तिला हिंदुस्थानांतील एक उत्तम कार्यकर्ती स्त्री

व्हायचें होतें. पण तिचें काय झालें!... इतकें बोलून त्यांनीं त्या चिमखड्या गोदावरीला दूर अंतराळांत भिरकावलें. तो त्या लहान गोदावरीचा देह वितळून जाऊन त्या जागीं आमच्या शेजारीं उभ्या असलेल्या निस्तेज, रोगट, गोदावरीबाईच्या देहांत विलीन झाला.

मोठ्या गोदावरीकडे बोट दाखवून ते म्हणाले, "लहानग्या गोदावरीला आपल्या या जगाची विशेष माहिती नव्हती. तिला वाटत होतें कीं, कष्ट केले, उद्योग केले, कीं आकांक्षा सफल होतात! पण तसें नाहीं हें आतां या मोठ्या गोदावरीला नीट कळलें.

हिचे वडील मास्तर होते. ही १६-१७ वर्षांची होईपर्यंत हिला घरांत ठेवणें, त्यांना दुरापास्त झालें. लग्न तर करायलाच हवें होते. पण लग्नाला हुंडा द्यायला पैसा कुठें होता त्यांच्याजवळ? शेवटीं कसाबसा एक कारकून जावई गाठून ते आपल्या जबाबदारींतून मुक्त झाले; आणि गोदावरी, कारकुनाची निरुपयोगी स्त्री म्हणून, जगांत मिरवीत आहे."

आणि ही बघितलीत का मजा! लहानग्या पुष्पेला वर उचलीत ते म्हणाले, "ही पुष्पा परांजपे. श्रीमंत बापाची एकुलती एक मुलगी होती ही. हिला मुळीं आकांक्षाच नव्हत्या. त्यामुळें त्या आकांक्षांकरतां झटण्याचा प्रश्नच नव्हता. पण तिचें काय झालें असें म्हणून त्यांनीं त्या पुष्पेला उचललें व दूर अंतराळांत भिरकावले. तों काय आश्चर्य! त्या लहानग्या पुष्पेचा देह, माझ्या शेजारींच उभ्या असलेल्या पुष्पावतीबाईसाहेबांच्या देहांत विलीन झाला. त्याकडे बोट दाखवून ते म्हणाले, "पुष्पाच्या बापाजवळ सपाटून पैसा होता. त्यानें त्या पैशांत एक I. C. S. जावई विकत घेतला; आणि आज या पुष्पावतीबाईसाहेब कलेक्टरीणबाई म्हणून जिकडे तिकडे मिरवीत आहेत!

या सर्व प्रकाराचा मला अर्थच कळेना. मी माझ्याजवळ जोशी होता, त्याला म्हणालों, "हें काय चाललें आहे? ही भुताटकी तर नाहीं?"

माझें हें बोलणें, हेडमास्तरांना कसें ऐकूं गेलें कोणास ठाऊक! पण ते मजजवळ येऊन म्हणाले, "ही भुताटकी नाहीं. परंतु तुम्हा पांढरपेशा वर्गांतील मुलांचीं आयुष्यें मात्र भुताटकीनें भरलीं आहेत. तुम्ही तुमच्या बालपणीच्या आकांक्षांचीं नुसतीं भुतें आहांत."

इतकें बोलून ते माझ्या लहानग्या आकृतीकडे गेले; आणि त्याला वर

उचलून म्हणाले, "याला काय व्हायचें होतें माहीत आहे का? याला व्हायचें होतें लेखक! खूप प्रवास करायचा होता याला. पण कॉलेजमध्यें असतांना याचे वडील वारले; आणि सर्व भावंडांची जबाबदारी याच्यावरच पडली. त्यामुळें याचें काय झालें माहीत आहे का..."

असें म्हणून त्यांनीं माझ्या त्या लहान आकृतीला वर उचललें; आणि तिला ते अंतराळांत भिरकावणार, इतक्यांत मीं धावत जाऊन त्यांचे हात धरले; आणि केविलवाण्या स्वरांत म्हणालों, "नका—नका, निदान त्या आकृतीचा तरी नाश करूं नका. किती रसरशीत आणि तेजस्वी दिसत आहे ती! निदान तिला तरी या शाळामास्तराच्या अशक्त, निर्जीव, मेलेल्या देहांत विलीन करूं नका."

यावर, कीर्तिकर हेडमास्तर अत्यंत निर्दयपणानें हसले. ते म्हणाले, "किसन, किती वेडा आहेस तूं? अशा तीस वर्षांपूर्वींच्या आकृति तशा कशा राहतील? तूं ज्या स्थितींत आयुष्याला सुरवात केलीस, ती स्थिति तुला हल्लींच्या अवस्थेंतच नेणार. गरीबाच्या घरचा हुशार मुलगा कारकून नाहीं तर शाळा-मास्तरच होणार" असें म्हणून त्यांनीं ती आकृति दूर अंतराळांत भिरका-वून दिली.

"मी बेभानपणें ओरडलों! भुताटकी, निव्वळ भुताटकी!!"

तों खरंच ती भुताटकी ठरली!

कारण तिथें कीर्तिकर हेडमास्तरही नव्हते; आमच्या लहान आकृत्याही नव्हत्या; पुष्पा नव्हती, अविनाश नव्हता, तुम्ही नव्हतां, आणि मीही नव्हतों.

आमच्या शाळेच्या ज्युबिली समारंभाच्या आमंत्रणपत्रिकेमुळें उत्पन्न झालेलीं भुतें मात्र माझ्या मनांत हजर होतीं!

---

## परमेश्वराने काय पाहिलें ? : २ :

हजारो– नव्हे लाखो, कोट्यवधि वर्षें झालीं त्या गोष्टीला. स्वर्गांतल्या कारागिरांनी आपली बुद्धि चालवून एक नवीन घर निर्माण केलें नि त्याचें नांव ठेवलें 'जग'. फारच सुंदर व गमतीदार होतें हें नवें घर ! त्याचें छप्पर तरी किती शोभिवंत आणि मजेदार होतें ! छपराचा रंग निळसर होता. पण तो तसा कायम राहत नसे. वर्षाच्या निरनिराळ्या ऋतूंत त्या छपराचा रंग सारखा बदलत राही. कधींकधीं तो काळाकुट्ट होई व एखादे वेळीं त्या छपराच्या पश्चिम बाजूस निरनिराळ्या गमतीदार व तेजस्वी रंगाचा शिडकाव केला जाई. रात्रीं तर फारच गंमत दिसे. एखाद्या मोठ्या दिवाणखान्यांत हंड्या व झुंबरें लावून द्यावींत त्याप्रमाणे त्या छपरावर निरनिराळ्या चटकदार चांदण्या चमकत असत. वर्षाऋतु सुरू झाला की वरून रुपेरी रंगाच्या जलधारा खाली ओघळत आणि सारें जग चैतन्यमय होई, जीवनाने बहरून निघे.

जगांत निरनिराळे अनेकविध प्रकार निर्माण केले होते. तेथे आकाशाला भिडूं पाहणारे मोठमोठे हिमालय जसे होते, तसेच कधीहि अंत न लागणारे सागर होते. अंगावर फळें बाळगणाऱ्या वृक्षांची जशी तेथें दाटी होती तद्वतच फुलांना जन्म देणाऱ्या आणि त्यांच्या सुवासाने सारें वातावरण सुगंधित करणाऱ्या वेलीहि होत्या. साऱ्या जगाचीच कल्पना मोठी सुरेख होती. त्यांत लहानलहान, छोटेछोटे ओढे होते. ऐन तारुण्यांत आलेल्या

स्त्रियांप्रमाणे किंचित् अवखळ आनंददायी नद्या होत्या. निरनिराळीं चित्र-विचित्र रंगांचीं फुलें होतीं आणि वातावरण निनादित करणारे अनेक पक्षिगण होते. वसंतऋतु आला की वृक्षांना पालवी फुटे, फुलांचा सुवास जिकडे तिकडे दरवळे आणि वृक्षांवरच्या पक्ष्यांच्या किलबिलाटाने सारें जग आनंदरसाने आकंठ भरून जाई.

या जगांत राहण्यास योग्य असे जीव निर्माण करण्याकरितां परमेश्वराने अनेक दिवस बुद्धि चालविली– डोकें खर्च केलें. त्याने नाना तऱ्हेचे प्रयोग केले. त्यांतले कित्येक अयशस्वी ठरले. शेवटीं अनेक प्रयोगांनंतर दोन जीव निर्माण करण्यांत आले. एकाचें नांव पुरुष अन् दुसरी स्त्री. पुरुषांत त्याने आकाशाला भेदूं पाहणाऱ्या मेरु पर्वताची महत्त्वाकांक्षा, सागराची विशालता आणि नेहमी दुसऱ्याला छाया देण्याची इच्छा करणाऱ्या वटवृक्षाची परोपकारिता ओतली होती; तर स्त्री म्हणजे तारकांचें तेज, नद्यांचा अवखळ-पणा आणि कोकिळ पक्ष्यांची सुरेलता यांचें मिश्रण होतें. सर्व देवांना पुरुष आणि स्त्रीची ती जोडी पसंत पडली. त्यांनी मोठ्या उत्सवाने आणि समा-रंभाने त्यांना जगांत राहायला पाठविलें. त्यांना आशा होती, की ते दोन जीव राहतील तेथे आनंदाचें साम्राज्य फुलवतील, आपल्या अंगच्या बुद्धि-मत्तेने जगाचें सौंदर्य अनेक पटींनीं वाढवतील.

परमेश्वराची कल्पना प्रथम खरी ठरली. पुरुष आणि स्त्रीने जगांतील भूभागापासून निरनिराळीं पिकें काढण्यास सुरवात केली. स्वतःला राहण्या-करिता सुरेख सुरेख घरें बांधलीं व नाना तऱ्हेचे शोध लावून पृथ्वीचें सौंदर्य अनेक पटींनी वाढविलें.

कालान्तराने प्रजा निर्माण झाली. अनेक माणसें जगांत राहूं लागलीं. अनेक जीव येथे पोसले जाऊं लागले. परमेश्वराला चिंता नव्हती. त्याला माहीत होतें, की पृथ्वी सुजलाम् आणि सुफलाम् आहे. वाटेल तितकीं माणसें पोसण्याचें सामर्थ्य तिला आहे. त्यामुळे तो उलट माणसांचें कौतुक करूं लागला. त्याला आशा होती— नव्हे खात्री होती, की मानव पृथ्वीचें कल्याण करणार, गुण्यागोविंदाने राहून तो पृथ्वीचें सामर्थ्य सहस्रावधीने तरी खास वाढवणार. याच विचारांत तो गढून गेला. आत्मानंदाच्या गुंगींत निमग्न झाला.

पण मानवाने मात्र त्या आशेची माती केली ! मानव बुद्धीने वाढत होता. प्रतिदिनीं निरनिराळे शोध लावीत होता. खुद्द परमेश्वराने निर्माण केलेल्या पंचमहाभूतांनासुद्धा तो कारणीं लावीत होता. पण त्याचें मन दिवसेंदिवस किडकें बनत चाललें होतें. जगांत राहणारा– पृथ्वीवर वास्तव्य करणारा मानव तितका एक, हा समज हळूहळू जात चालला होता. बंधुभाव नष्ट झाल्यावर मग कलह कितीसा लांब राहणार ? मानवांनी आपापसांत मारामाऱ्या सुरू केल्या, मोठमोठीं युद्धें खेळलीं जाऊं लागलीं व त्याचबरोबर जगांतील संपत्तीचा, सुखांचा सर्व उपभोग घेण्याचा राखीव हक्क मानवांच्या एका वर्गानें घेतला आणि इतर सर्व वर्ग दास्यांत व अज्ञानांत ठेवले. मग जगांत मोठा असंतोष माजला. नाना प्रकारच्या चळवळींना तर नुसता ऊत आला. जुलूम-जबरदस्तीला तर ताळतंत्रच राहिलें नाहीं.

परमेश्वर आत्मचिंतनांतच दंग होता. कधी कधी मानवांच्या आपापसांतील युद्धाच्या बातम्या तो ऐके. 'दुष्काळ' हा नवीन शब्द अलीकडे त्याच्या कानांवरून नित्य नियमाने जाऊं लागला. बेकारीमुळे आत्महत्या केल्याची बातमी तो कधी कधी ऐके, तर कधी कधी कित्येक गरीब लोकांनी कोणता तरी बाजार लुटल्याची वार्ताहि त्याच्या कानांवरून जाई. त्याला मोठें आश्चर्य वाटे ! दुष्काळ पडून लोकांना खायलासुद्धां मिळूं नये याचें त्याला फार नवल वाटे. त्याला प्रश्न पडे, की पृथ्वींत इतकीं नाना तऱ्हेचीं धान्यें प्रतिवर्षी निर्माण होत असतांना माणसाची अन्नान्नदशा कशी होऊं शकेल ? बेकारी व चोरी या शब्दांचे तर त्याला कित्येक दिवस अर्थच कळले नाहींत ! आणि जेव्हा कळले, तेव्हा त्याला मनस्वी आश्चर्य वाटलें. इतक्या सगळ्या सुखसोयी असतांना मानवाने दुःखी कां असावें याचा तो नेहमी विचार करी.

अशींच आणखी कित्येक वर्षें गेलीं. परमेश्वर विचारांतच गढून गेला होता. पण प्रतिवर्षी त्याच्या कानांवर निरनिराळ्या जास्त भयानक बातम्या पडूं लागल्या. त्याला राहवलें नाही. त्याने पृथ्वीवरून एक चक्कर मारून येण्याचें ठरविलें.

परमेश्वराने पृथ्वीवर उतरण्याकरिता ठिकाण नियोजित केलें तें महाराष्ट्रांतलें एक पहिल्या प्रतीचें शहर होतें. ज्ञानदानाकरिता त्याची प्रसिद्धि होती. तेथे नाना तऱ्हेचीं विद्यामंदिरें होतीं. संस्कृतीचा बडेजाव तिथल्याइतका दुसऱ्या कोणत्याच शहरांत नव्हता.

त्या शहराच्या एका भागांत परमेश्वर उतरला– मनुष्यरूपाने अवतीर्ण झाला. तो भाग मोठा सुरेख होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनी सुरूचीं झाडें लावलीं होतीं आणि त्या झाडांआडून सुरेख, शोभिवंत बंगले दिसत होते. कोठल्या तरी मंजुळ संगीताने सर्व वातावरण निनादित झालें होतें आणि संध्याकाळची वेळ असल्यामुळे त्या रस्त्यावरून फिरणाऱ्या तरुण स्त्रिया मोठ्या शोभिवंत दिसत होत्या. साऱ्या वातावरणांत आनंद नुसता भरून राहिला होता! वसंताचें आगमन जणूं जिकडे तिकडे झालें होतें.

मोठा आनंद वाटला परमेश्वराला! "एकूण मानवजात सुखांत आहे तर!" त्याने मनांत म्हटलें, "उगीचच नुसत्या बातम्या स्वर्गांत ऐकल्या आणि चिंता करीत बसलों!"

असे विचार करीत तो पुढे चालला. त्याला एक विस्तीर्ण पूल लागला आणि मग शहराचा दुसरा भाग सुरू झाला. हा भाग पहिल्याइतका चांगला नव्हता. येथले रस्ते खडकाळ होते, घरें पडलेलीं होतीं आणि रस्त्यावरून चालणाऱ्या माणसांतसुद्धां एक प्रकारचा विषण्णपणा भरून राहिला होता. जगण्याची गंमत त्यांना वाटत नसावी. कसें तरी जगायचें म्हणून जगत होते ते लोक!

पुलाच्या कोपऱ्यावर चारपांच तरुण घोळका करून उभे होते. त्यांच्या हातांत कसले तरी छापील कागद होते. कोठल्या तरी विषयावर तावातावाने त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. परमेश्वराने त्या कागदाकडे बघितलें. तो कोणत्या तरी वर्तमानपत्राचा जादा अंक होता. त्या अंकांतील ताज्या बातम्यांबद्दलच त्या लोकांत चर्चा चालली होती.

त्यांच्या बोलण्यावरून परमेश्वराला इतकें समजलें, की जगांत कुठे तरी प्रचंड युद्ध सुरू होतें. प्रतिदिनीं लाखो, कोट्यवधि लोक मरत होते, त्यांचीं घरेंदारें जाळलीं जात होतीं! इतकी प्रचंड हिंसा माणसें कां करतात हा जसा परमेश्वराला प्रश्न पडला, तद्वतच या युद्धामुळे त्या तरुण लोकांना दुःख न होतां उलट आनंदच होत आहे हें पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. घरांतला एखादुसरा माणूस मेला तर आकान्त करणारे लोक त्याला माहीत होते; मग इथे तर होमकुंड पेटलें होतें, मानवांच्या अस्थींच्या चिता पेटत होत्या तरी लोक हसत होते, मजा करीत होते!

त्याला राहवलें नाही. त्याने शेवटीं विचारलेंच, " काय हो, या युद्धामुळे तर आपणाला दुःख व्हायला पाहिजे नि तुम्ही तर सारखे हसत आहांत, खिदळत आहांत ! "

प्रथम त्याच्या बोलण्याकडे कुणीं· लक्ष दिलें नाही. त्यांपैकी किंचित् तेजस्वी दिसणारा एक तरुण एवढेंच म्हणाला, " तुमच्या बोलण्यावरून जगाचं ज्ञान तुम्हांला नाही. पोटापाण्याची विशेष चिंताहि तुम्हांला नसावी ! "

" अहो, पण यांत पोटापाण्याचा प्रश्न आलाच कुठं ? "

" भले गुरु ! " तोच मुलगा पुढे म्हणाला, " अहो, हें युद्ध सुरू झालं म्हणून तरी बेकारी कमी झाली. नोकऱ्यांची पैदास किती तरी वाढली. किती नोकऱ्या ! एका हातांत एक धरून ठेवली तरी हरकत नाही. युद्धाच्या आधी कुठं होत्या नोकऱ्या ? आमच्या घरांत आम्ही तिघे भाऊ बेकार होतों. पण युद्धाचे पडघम वाजूं लागले अन् मग बेकारी पार पळाली. एका भावाला व्हाइसरॉय कमिशन मिळालं. आम्हां दोघांना कारकुनाच्या नोकऱ्या लागल्या."

परमेश्वराला फार खेद झाला. युद्धामुळे नोकऱ्या लागल्या म्हणून आनंद मानणारे लोक आणि शेजारचें घर पेटवून देऊन त्यावर शेकत बसणारे लोक त्याला सारखेच वाटले. पण लगेच त्याच्या डोक्यांत विचार आला, येथे लोकांचा काय दोष ?

युद्धाबद्दल त्या तरुणांच्या मोठ्या हिरिरीने गप्पा चालल्या होत्या. अमक्या राष्ट्राने तमक्या राष्ट्रावर हल्ला केला, हजारो लोक मेले इत्यादि बातम्या ते लोक एकमेकांना सांगत होते. परमेश्वराला प्रश्न पडला की राष्ट्र म्हणजे काय ! त्याने सारें जग मानवजातीला राहायला दिलें होतें. त्या जगाच्या फळ्या माणसांनी पाडाव्यात अशी त्याची इच्छा नव्हती. त्याच्या दृष्टीने अखिल मानवजात एक होती. वैचित्र्य म्हणून त्याने कुणाला पिवळे, कुणाला काळे, कुणाला पांढरे रंग फासले होते. केवळ सोय म्हणून कांही मानव जगाच्या एका भागांत, तर कांही दुसऱ्या भागांत राहत होते. पण म्हणून एका भागांत राहणाऱ्या लोकांनी स्वतःला राष्ट्र म्हणवून घेऊन दुसऱ्या भागांत राहणाऱ्या लोकांवर हल्ला करावा ही कल्पना त्याला हास्यास्पद व अनैतिक वाटली. याविषयी कांही तरी विचारावें असें त्याला वाटलें; पण त्याने विचारलें नाही.

तरी थोड्या वेळाने जेव्हा युद्ध-हेतूंविषयी त्या लोकांत चर्चा सुरू झाली तेव्हा त्याला राहवलें नाही. त्याने विचारलेंच, "हीं युद्धं कशासाठी होतात हो ?"

एका तरुणाने तिरसटपणाने उत्तर दिलें, "माणसं मारण्यासाठी आणि शहरांचा नाश करण्यासाठी."

परमेश्वराचा चेहरा हिरमुसला झाला. त्याकडे बघून मघाचाच तो तेजस्वी तरुण म्हणाला, "तुम्हांला एवढं कसं कळत नाही ? म्हणे युद्धं कशासाठी लढलीं जातात ? या प्रश्नाचं उत्तर रस्त्यावरचं पोरसुद्धा सांगेल ! अहो, हीं युद्धं मानवजातीच्या उन्नतीसाठी आणि आनंदासाठी लढलीं जातात !"

परमेश्वराला हसूं कोसळलें. तो खूप मोठ्यांदा हसला आणि म्हणाला, "मोठं गमतीदार बोलतां बुवा तुम्ही ! मानवजातीच्या कल्याणासाठी युद्ध हं ! मानवांच्या कल्याणासाठी मानवांचा संहार ! प्रत्यक्ष परमेश्वरालासुद्धा न सुचणारी कल्पना आहे ही !"

तो युवक म्हणाला, "परमेश्वराला काय कल्पना सुचाव्यात ! त्यानं फक्त स्वर्गात राहावं, अमृत प्यावं नि अप्सरांच्या नाचरंगांत तल्लीन व्हावं. आमच्या चर्चिलसाहेबांना नि हिटलरला दररोज असल्या कल्पना सुचतात. दोघेहि मानवांच्या अंतिम सुखासाठी लढत आहेत, दोघांनाहि नवं जग निर्माण करायचं आहे."

"नवं जग ?" मागे एकदा विश्वामित्राने नवें जग निर्माण करण्याचा हास्यास्पद प्रयत्न केला होता. त्याची आठवण होऊन परमेश्वराने विचारलें, "नवं जग निर्माण करणार ? दोघांचीहि नव्या जगाची कल्पना एकच आहे का ? का दोन नवीन जगं निर्माण करणार ?"

"कुणास ठाऊक !" तो तरुण म्हणाला, "तूर्त तरी आपण जें जें होईल तें तें पाहावं या मंत्राचा अवलंब करावा. सध्या तरी आपल्या अंगावर जुनं जगच कोसळून पडत आहे. त्याखालीच गाडले नाही गेलों तर नवीन जग दिसणार !"

त्यांना अजून खूप प्रश्न विचारण्याची परमेश्वराला इच्छा होती; पण ते तरुणच कंटाळले होते. ते त्याला कुणी वेडापीर समजत होते. ते निघून गेले. परमेश्वर एकटा एकाकी पडला. तो पुढे चालूं लागला.

रस्त्यावर किंचित् अंधार पडला होता. संध्याकाळचे सात वाजून गेले होते. आकाशांत तुरळक तुरळक नक्षत्रें डोकावत होतीं. मंद असा गार वारा सुटला होता. लोक घरीं परतत होते. ते सगळे बहुधा पांढरपेशा वर्गातले होते. आकाशांतील नक्षत्रांकडे किंवा मंद वाऱ्याकडे कुणाचेंच लक्ष नव्हतें. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर भेसूर अवकळा आली होती.

परमेश्वराला मोठें आश्चर्य वाटलें! असें कां व्हावें? वसंतऋतु सुरू झाला होता. पण वसंताचें आगमन लोकांच्या हालचालींत, त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हतें. सारा सुतकी कारभार होता जिकडे तिकडे! याचें कारण परमेश्वराला कळेना!

तो तसाच पुढे चालला होता. बाजारपेठ लागली. मोठमोठीं धान्याचीं दुकानें तिथे होतीं. अनेक लोक तिथे माल खरेदी करीत होते. तेथे गेल्यास जगाविषयी जास्त माहिती कळेल म्हणून परमेश्वर आंत शिरला.

आंत एक मध्यम वयाचा, संसारी माणूस धान्य घेत होता. धान्याच्या भावाकडे बघून तो म्हणाला, "संपलाच कारभार सारा! सगळेच भाव मुळी वाढलेले. तांदूळ तर किती महागले आहेत! रॉकेल, डाळ, साऱ्याच जिनसांचे दर वाढले आहेत. काय विकत घ्यायचं नि काय खायचं! एक वेळ जेवायची वेळ आली नाही म्हणजे मिळवली!"

परमेश्वराने त्यांच्या बोलण्याला मान हालविली व कांही तरी जिन्नस घेतल्यासारखें करून तो त्या माणसाबरोबर बाहेर पडला. त्याला त्या माणसाची माहिती विचारून घ्यायची होती. शितावरून भाताची परीक्षा याप्रमाणे त्या माणसाच्या माहितीवरून जगाची परीक्षा त्याला करायची होती.

त्या माणसाची हकीगत मोठी कारुण्यपूर्ण होती. बायको क्षयाने अंथरुणाला खिळली होती. न खिळेल तर काय करील? बायकांच्या जीवनाची तीच परिणति होती. माहेरीं काम, सासरीं लग्न झाल्यापासून सारखें काम! स्वयंपाक, धुणींपाणी, उष्टींखरकटीं आणि बाळंतपणें यांतच त्या बाईच्या वैवाहिक जीवनाचीं वीस वर्षें गेलीं होतीं. वीस वर्षांत नाना तऱ्हांनी जग पालटलें. वसंतऋतु आले नि गेले! वृक्षांना पालवी फुटली व फुलांचा सुगंध आसमंतात् पसरला. पण त्या स्त्रीचें जीवन जें स्वयंपाकघरांत पुरलें गेलें तें

कायमचें ! त्या ठरीव, निर्बुद्ध व चैतन्यहीन जीवनाने शेवटीं देहावर सूड उगवला. तो देह झिजत गेला.

त्या माणसाला सहा अपत्यें होतीं. दोन मुलें व चार मुली. चारपैकीं एकीचें लग्न झालें व त्यांतच तो आर्थिक दृष्टीने खलास झाला! बाकीच्या तिन्ही मुली अगदी गळ्याला लागल्या होत्या. त्यांच्या लग्नाची चिंता त्याला त्रास देत होती, त्याचें हृदय जाळीत होती. तो परमेश्वराला काकुळतीने म्हणाला, " मुलांचं मला कांही वाटत नाही; पण या तीन मुलींचं मी काय करूं ? त्यांचीं लग्नं कशी करूं ? लग्नं नाहीत व दारिद्र्यामुळं शिक्षण नाही– या स्थितींत त्यांनी तरी घरांत खितपत किती दिवस काढावे ? एखादे वेळीं कांही वेडंवाकडं हातून घडलं तर !..."

परमेश्वराला त्या गृहस्थाची दया आली. पण त्याच्या चिंतेचा अर्थ त्याला कळेना ! मुलींच्या लग्नाची चिंता वाहण्याचें कारण त्याला समजेना ! 'लग्न म्हणजे परस्परांचें आकर्षण' असेंच तो समजत होता. त्याला अलीकडील लग्नांचें बाजारी स्वरूप माहीत नव्हतें.

तो माणूस अर्धवट स्वतःशींच आणि अर्धवट परमेश्वराला उद्देशून म्हणाला, " मुलींच्या लग्नाचा प्रश्न मोठा बिकट झाला आहे बघा अलीकडे ! एक लग्न म्हणजे हजार रुपये समजा तुम्ही ! कुठले आणायचे इतके पैसे ? अहो, दोन वेळ खायला मिळायची मारामार ! "

तो गृहस्थ घरीं निघून गेला. परमेश्वर भटकत राहिला. त्या गृहस्थाचा इतिहास त्याच्या डोळ्यांपुढून सरकत होता. त्याच्या तिन्ही मुली त्याच्या मनश्चक्षूंपुढे दिसत होत्या.

आता बरीच रात्र झाली होती. जिकडे तिकडे निजानीज झाली होती. मोठमोठ्या वाड्यांचीं दारें लावलीं जात होतीं. जिकडे तिकडे अगदी शांत होतें. देखावा असा होता, की जणू सर्व पृथ्वींतील माणसें सुखाने झोपीं गेलीं होतीं.

पण परमेश्वर आता या देखाव्याने फसला नाही. तो खूप भटकला. लाखो, हजारो लोक त्याला घरादारांशिवाय भटकतांना दिसले. कित्येक फूटपाथवर आडवे झाले होते, कित्येकांनी दुकानांच्या फळ्यांवर घोंगड्या पसरल्या होत्या. त्यांचीं शरीरें थंडीमुळे आखडलीं होतीं, त्यांनी ऊब येण्याकरिता गुडघे छातीशीं भिडविले होते.

असें हिंडतां हिंडतां, जग पाहतां पाहतां तो एका गल्लींत आला. रात्र झाल्याची आठवणसुद्धा त्या गल्लींतल्या लोकांना नव्हती. जिकडेतिकडे दिव्यांचा लखलखाट होता. क्वचित् एखाद्या माडींत गाणें चाललें होतें. बाकीच्या इतर माड्यांतील खिडक्यांतून, घरांच्या सज्जांतून, रस्त्यावरसुद्धा कित्येक स्त्रिया नाना तऱ्हेचे अंगविक्षेप करीत उभ्या होत्या. त्यांनी चेहऱ्याला निरनिराळे रंग लावले होते. खालून जाणारे-येणारे लोक त्या स्त्रियांकडे सरळ—अगदी न भितां—बघत आणि स्त्रियाहि लज्जेचा किंवा विनयाचा अवशेषसुद्धा न दर्शवतां त्या माणसांकडे बघत– हसतसुद्धा !

परमेश्वराला फार संताप आला. त्याने स्त्री म्हणजे पावित्र्याची पुतळी कल्पिली होती. आणि इथे तर अगदी भलताच प्रकार होता ! फाटक्या अंगाचा एक माणूस विडी पीत, वरच्या स्त्रियांकडे दृष्टि टाकीत चालला होता. त्याला परमेश्वराने विचारले, " काय आहे हो इथं ? या स्त्रिया अशा खिडक्यांत कां उभ्या राहिल्या आहेत ? "

त्या माणसाने आपल्या तारवटलेल्या नजरेने त्याच्याकडे बघितलें आणि एकदम भुतासारखें खो खो हसून म्हटलें, " काय राव उगाच अवसान आणताय् ! उगाच चेष्टा करायची व्हय आमची ? जा जा आपल्या रस्त्यानं. हा खंडोबा पिटकर असल्या चेष्टांना बधायचा नाही."

परमेश्वराला मोठें आश्चर्य वाटले. त्याला प्रथम त्या स्त्रियांचा राग आला होता. पण जेव्हा त्याला अंतर्ज्ञानाने सर्व माहिती कळली तेव्हा त्याला त्यांची कीव आली. त्या स्त्रिया वेश्या होत्या. आपल्या देहाचा विक्रय करून स्वतः-चीं पोटें भरण्याची सक्ती समाजाने त्यांच्यावर केली होती. जिवंत राहण्या-करिता त्यांना दुसरा मार्ग नव्हता ! त्यांनी असेच त्या नरकांत दिवस काढायचे, निरनिराळे भयंकर रोग शरिराला जडवून घ्यायचे आणि नंतर बरेच दिवस खितपत पडून हालहाल, अन्नान्नदशा होऊन शेवटीं मरून जायचें असा कार्यक्रम समाजाने त्यांच्याकरिता आखला होता.

अत्यंत वाईट वाटून परमेश्वर बाहेर पडला. पश्चात्ताप झाला त्याला. त्या-पेक्षां जगाची निर्मिति नसती झाली तरी बरें असें त्याला वाटलें !

आता उत्तररात्र झाली होती. हवेंत मनस्वी गारठा आला होता. पण परमेश्वराला तो गारठा जाणवला नाही. सृष्टींतील गारठ्याने त्याचें मन जणू

बधिर झालें होतें. त्या बधिरावस्थेंत तो हिंडत होता, भटकत होता. वाया गेलेलीं, नायनाट झालेलीं, धुळीला मिळालेलीं जीवनें त्याला दिसत होतीं. त्याच्या डोळ्यांतून दुःखाश्रु गळत होते. केवढा प्रचंड नाश झाला ! जगाची उभारणी त्याने किती कल्पकतेने केली होती ! सगळें सौंदर्य तेथे ओतलें होतें. त्या साऱ्या सौंदर्याचा मानवाने नाश केला होता !

परमेश्वर असाच भटकत राहिला. उत्तररात्र संपून पहाटेचे गार वारे सुटायला लागले होते. झाडांवरच्या पक्ष्यांना कंठ फुटायला लागले आणि वेलींवरचीं कोवळीं फुलें सूर्यकिरणांची वाट बघायला लागलीं. आकाशांतून नक्षत्रांचा खच आता कमी झाला होता. एकदोन तुरळक चांदण्या अजून रेंगाळत राहिल्या होत्या; त्या झोपेला आलेल्या लहान मुलाच्या डोळ्यां-प्रमाणे दिसत होत्या. सारें जग– सारी पृथ्वी चैतन्याने न्हाऊन निघाली. पक्ष्यांचे कंठ जास्तच गोड गायन करूं लागले आणि सूर्यनारायणाचें आगमन झालें.

परमेश्वराने हें सारें दृश्य बघितलें. त्याला आनंद झाला नाही. सूर्याने प्रातःकाळीं वेळेवर उगवावें व सृष्टीला नवचैतन्य प्राप्त करून द्यावें, पक्ष्यांनी आपल्या कंठांतून सुस्वर काढावेत, फुलांनी स्वतःच्या सुगंधाने साऱ्या दिशा पुलकित कराव्या, अशी त्याची योजना होती. पण ती कशासाठी ? तर मानवाने सुखी व्हावें म्हणून. मनुष्यजातीच्या सुखाची त्याला काळजी– अंतरीची तळमळ लागली होती. पण ती मनुष्यजात मुळीच सुखी नव्हती ! त्यांतले हजारो, लाखो लोक दुःखी जीवन जगत होते. मग त्या इतर उपाधींचा काय उपयोग ? मानव म्हणजे साऱ्या पृथ्वीचा आत्मा– हृदय ! तेंच बंद पडल्यावर नुसत्या मातीच्या शरिराची काय कथा !

याच विचारांत तो भटकत राहिला. एक कर्कश शिटी त्याने ऐकली. विचारतंद्रींतून जागें होऊन त्याने आजूबाजूला पाहिलें. एक प्रचंड गिरणी तेथे धुराचे लोट सोडीत उभी होती ! जणू नरमांसावर यथेच्छ ताव मारून चिलीम ओढणारी ती राक्षसी होती ! शेकडो, हजारो मजूर कामावर चालले होते. त्यांत म्हातारे होते, त्यांत तरणे होते, तरुण स्त्रियाहि होत्या. त्यांचे चेहरे पडलेले व हास्य लोपलेलें होतें. परमेश्वर कोणाला माहिती विचार-ण्याच्या फंदांत पडला नाही. त्यांचे चेहरेच माहिती सांगत होते. सकाळ-

पासून रात्रीपर्यंत त्या गिरणींत राबायचे आणि महिन्याच्या शेवटीं मिळालेल्या अल्प वेतनावर अर्धपोटीं राहायचे हीच त्यांची माहिती होती. तेथे शिक्षण नव्हतें, संस्कृति नव्हती. मोठमोठे वादविवाद नि चर्चा तर नव्हत्याच नव्हत्या. होतें काय, तर दारिद्य आणि अज्ञान. तेच त्यांचे मरेपर्यंतचे सोबती होते.

तें दृश्य पाहून परमेश्वर शहरांत हिंडला, मजुरांत हिंडला. शाळामास्तरांच्या दुःस्थितीची कहाणी त्याने ऐकली. हॉटेलमधल्या कोवळया पोरक्या पोरांची त्याने कीव केली. सर्वत्र त्याला दुःख व दैन्य दिसलें.

संध्याकाळीं तो स्टेशनच्या बाजूस गेला. एका बाजूस खुराड्यासारख्या प्रचंड इमारती होत्या. त्या इमारतींकडे सहज त्याचें लक्ष गेलें. त्यांतून लोक बाहेर पडत होते. दमलेले, गलितगात्र झालेले, जीवनाशीं उदास व निराश झालेले कारकून सर्व दिवसाची वेठ मारून त्या कारकूनखान्यांतून बाहेर पडत होते. श्रमांनी, कंटाळवाण्या कामाने त्यांचे चेहरे विद्रूप झाले होते. परमेश्वर एका कारकुनामागून गेला. अगदी कारकून जसा असायला पाहिजे तसा तो होता. मळके धोतर, ओंगळ शरीर आणि मुडपलेली टोपी हीं त्याचीं लक्षणें होतीं. हातांतली छत्री एखाद्या बंदुकीप्रमाणे त्याने खांद्यावर टाकली होती, तोंडांतल्या तोंडांत पुटपुटण्याची त्याची सवय कुणालाहि ओळखतां येण्याजोगी होती.

त्याच्या हातांतली छत्री पाहून परमेश्वराला कुतूहल निर्माण झालें. ते पावसाळ्याचे दिवस नव्हते; उलट आकाश निरभ्र होतें. परमेश्वराने त्याच्याजवळ जाऊन विचारलें, "काय नानाऽ! अहो, छत्री कशाला बरोबर आणलीत आज? पावसाळा संपला हेंसुद्धां नाही का लक्षांत राहिलं?"

तो कारकून खिन्नपणाने हसला. तो उद्गारला, "कुणाला ठाऊक संपला की सुरू झाला ते! पाऊस आला तर छत्री उघडायची, ऊन लागूं लागलं तरी ती उघडायची, नाही तर अशी खांद्यावर ठेवून द्यायची अशी आपली वहिवाट आहे. छत्रीशिवाय करमतच नाही! रस्त्यांतून चालतांना हातांत छत्री आणि ऑफिसांत काम करतांना तपकिरीची डबी ही पाहिजेच."

"अहो, पण पावसाळा केव्हाच संपून गेला! वसंतऋतूलासुद्धां सुरवात झाली!"

"पावसाळा संपला म्हणतां? असेल बुवा! तुमच्या म्हणण्याप्रमाणं कदाचित् वसंतऋतूला सुरवात झाली असेल. आम्हांला या गोष्टी वर्तमानपत्रं वाचून कळायच्या. मी सकाळीं चहा पितांना वर्तमानपत्रांवरून थोडी नजर टाकतों ना, त्यावरून मला ऋतु पालटल्याचं कळतं. रेनकोटांच्या जाहिराती सुरू झाल्या की पावसाळयाचं आगमन खचित होणार असं अनुमान काढतों. महाबळेश्वर किंवा माथेरान येथील हॉटेलांच्या जाहिराती मोठ्या प्रमाणावर सुरू झाल्या की मग आमचा उन्हाळा सुरू होतो आणि शक्तिवर्धक औषधांच्या जाहिरातींबरोबरच आमच्या अंगांत हुडहुडी भरते. बाकी आमच्या नेहमीच्या जीवनांत या गोष्टी आम्हांला कळत नाहीत. आता नोकरीला लागून तीस वर्षं झालीं. तीस वर्षांत दररोज तोच रस्ता, तींच माणसं, तेंच ऑफिस, तीच नेहमीची जिगजिग, तेंच राहायचं ठिकाण!"

"काय—म्हणतां काय! तीस वर्षं एका ठिकाणी नोकरी केलीत? तुम्हांला कंटाळा कसा आला नाही? तुम्हीं बंड कसं केलं नाहीत?"

कारकुनाने आपली चाळशी काढली आणि सदऱ्याच्या पुढच्या बाजूस पुशीत म्हटलें, "बंड हा शब्द फार जड आहे. त्याचं पथ्य आहे आम्हांला. कंटाळा मात्र प्रथम प्रथम येई. मी तेव्हा नुकताच शाळाकॉलेजांतून बाहेर पडलेला छोकरा होतों. ऑफिस म्हणजे तुरुंग वाटे. खरोखर वाटे, नोकरी सोडून द्यावी व चंडोलासारखं भटकावं. सृष्टीचीं निरनिराळीं दृश्यं बघत जीवन व्यतीत करावं. पण ती कविकल्पना होती. व्यवहाराचे एकदोन तडाखे बसले आणि मग मला तरी हा तुरुंगच गोड वाटूं लागला! आता हा तुरुंगच माझं सर्वस्व! यमाचं बोलावणं येईपर्यंत इथून सुटका नाही!"

तो कारकून निघून गेला. परमेश्वराच्या हृदयाला चटका लावून गेला. तो कारकून नव्हता, क्षुद्र मानवही नव्हता प्रत्यक्ष परमेश्वराचा गुरु झाला होता तो. जगाविषयी यथार्थ कल्पना त्याने परमेश्वराला दिली.

ती कल्पना घेऊनच परमेश्वर अंतर्धान पावला व स्वर्गांत परत गेला. सर्व देव वाट पाहत होते. सृष्टीची हालहवाल कळण्याबद्दल त्यांना उत्सुकता लागली होती.

लगेच दरबार बोलावण्यांत आला. सर्व देव जमले. परमेश्वर उच्चासनावर विराजमान झाला. अप्सरांच्या नाचाला त्याने आज बंदी केली. एकदम

परमेश्वराने बोलण्यास सुरवात केली सारी देवसभा चित्रासारखी तटस्थ होती. परमेश्वर उद्गारला,

" सभाजनहो ! तुम्ही एवढ्या आशेनं व अपेक्षेनं इथं जमलां आहांत; पण मला तुमची निराशा करणं प्राप्त आहे. जगाविषयींचे आपले सर्व अंदाज चुकले ! आपला प्रयोग फसला."

एकदोन उतावीळ देव जोमाने उद्गारले, " काय ? प्रयोग फसला ? "

" होय. आपला प्रयोग फसला. जगाचं बाह्य स्वरूप आपण योजल्याप्रमाणं सुरेख आहे. सूर्य उगवतो, चंद्रापासून चांदण्याची प्राप्ति होते व फुलांच्या सुवासानं सारी पृथ्वी चैतन्यमय होते ही गोष्ट खरी आहे. पण हें सारं झालं बाह्य स्वरूपासंबंधानं. पण जगाच्या अंतर्यामाकडे जरा दृष्टि टाकाल तर सारा घोटाळा तुम्हाला दिसेल. मूठभर मानव जर सोडले, तर बाकीच्या कोट्यवधि मानवांच्या वाट्याला अज्ञान आहे, दारिद्र्य आहे व दास्य आहे. त्यांना दुसरं जीवन उरलेलं नाही. या कोट्यवधि मानवांची सुटका झाली पाहिजे. जगांतील नाना तऱ्हेचीं सुखं त्या सर्वांना प्राप्त झालीं पाहिजेत."

एक भोळा देव उद्गारला, " देवा ! मग आपणच अवतार घ्यावा. आपणच कृष्णरूपांत असतांना म्हणून ठेवलं आहे, " यद ायदा हि धर्मस्य..."

परमेश्वर हसून उद्गारला, " छे छे ! आता एकट्यादुकट्या अवतारानं काम व्हायचं नाही. एकटा माणूस काय करणार ? त्याला अखिल जनताच देवस्वरूप– शक्तिशाली व्हायला पाहिजे. आणि ती शक्ति त्या त्यांच्या कष्टांपासून प्राप्त होईल अशी मला खात्री वाटते."

" तथास्तु." बृहस्पति उद्गारले आणि देवसभा विसर्जन पावली !

---

# आमच्या आळींतील स्त्रिया : ३ :

स्त्रीजातीबद्दल माणसाला कोणत्या वयांत कुतूहल वाटायला लागतें याबद्दल मानसशास्त्रज्ञांचे शोध नि नियम काय आहेत हें मला माहीत नाही. पण मला असें वाटतें, की स्त्रियांबद्दलचें हें आकर्षण माणसाच्या मनांत अगदी लहान वयापासून अस्तित्वांत असावें व बहुधा सर्व आयुष्यभर तो आसपासच्या स्त्रियांबद्दल निरनिराळी माहिती जमविण्यास व समजून घेण्यास उत्सुक नि तत्पर असावा. माझ्या वाचकांपैकी इतर कोणाचा हा अनुभव आहे कीं नाही हें मला माहीत नाही; पण निदान माझ्या बाबतींत तरी खोटी लाज अगर विनय बाजूला ठेवून हें कबूल केलें पाहिजे, की मला आसपासच्या स्त्रियांबद्दल मनस्वी आकर्षण वाटतें. त्यांच्या नांवांबद्दल, त्यांच्या घरांतील अंतर्भागाबद्दल व त्यांच्या स्वभावांतील निरनिराळ्या छटांबद्दल नेहमी एक प्रकारचें कुतूहल माझ्या मनांत थैमान घालीत असतें; आणि संधि आल्यास त्या स्त्रियांबद्दलची निरनिराळ्या प्रकारची माहिती मिळविण्यास मी कमी करीत नाही– नव्हे, माझ्या मनाला लागलेला तो एक प्रकारचा विलक्षण छंदच आहे. कोणत्याहि नवीन जागीं मी राहावयास गेलों की आसमंतांतील स्त्रीजीवनाची प्रत्यक्ष माहिती मिळविण्याची आणि त्यांतील ठळक अशा स्त्रियांच्या जीवनावर अगदी नांवनिशीवार टिपणें करण्याची मला सवय आहे. आणि याच सवयीनुसार मीं आमच्या आळींतील स्त्रियांच्या आयुष्यांवर लिहिलेलीं टिपणें वाचकांपुढे मांडीत आहे.

आमच्या आळींत शिरल्यानंतर उजव्या हाताच्या कोपऱ्यावर एक भव्य

आणि तिमजली वाडा तुम्हांला दिसेल. तेंच रा. ब. कीर्तन्यांचें घर. रा. ब. कीर्तने हे एक जुन्या पिढींतील न्यायमूर्ति रानडे छापाचे सुधारक आहेत. सर्व देशांत अज्ञान आहे, दारिद्य आहे व अनाचाराचा गोंधळ आहे हें त्यांचें आज पंचवीस वर्षें प्रामाणिक मत आहे; व देशांतील हें सारें दारिद्य आणि अज्ञान सामाजिक सुधारणांनी दूर होईल असें ते नेहमी प्रतिपादतात. राजकीय चळवळीची प्रगति इतकी झाली व कॉंग्रेसच्या राजकारणाचा परिणाम देशांतील लहानथोर व्यक्तींवर– स्त्री अगर पुरुषांवर– होऊं लागला तरी अजून रा. ब. कीर्तने हे "आधी सामाजिक का राजकीय?" हा जुनाच वाद चिवडीत बसले आहेत व अगोदर सामाजिक सुधारणाच झाल्या पाहिजेत हें त्यांचें ठरीव व घोटीव मत आहे. कॉंग्रेसने देशाची हानि केली आणि गांधींना राजकारण कळत नाही हीं जुनीं मतें सांगतां सांगतां रा. ब. विधवा-विवाहाबद्दल अजूनहि तावातावाने शिरा ताणून बोलत असतात.

यावरून रा. ब. कीर्तने हे सरकारी नोकरींत मानमान्यता पावलेले गृहस्थ आहेत हें जसें तुम्ही ओळखाल, तसेंच त्यांनी आपल्या आयुष्यांत समाज-सुधारणेला कधी ना कधी हातभार लावला असला पाहिजे हाहि तर्क तुम्ही करालच. बरोबर आहे तुमचा तर्क. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी रा. ब. कीर्तन्यां-ची प्रथम पत्नी मयत झाल्यानंतर त्यांनी दुसऱ्या कुमारिकेशीं लग्न न लावतां एका तरुण नि सुस्वरूप विधवेशीं पुनर्विवाह केला आणि समाजकार्याला जोराने चालना दिली. त्यांच्या पुनर्विवाहित पत्नी म्हणजेच हल्लीच्या रावबहादुरीणबाई मालतीबाई कीर्तने. समजलें तुम्हांला रावबहादुरीणबाईंनी कोणतें समाजकार्य केलें तें? त्यांचा पुनर्विवाह झाल्यानंतर रीतीप्रमाणे सनातनी समाजाकडून त्यांच्यावर टीकेचा भडिमार झाला व चारदोन भटां-भिक्षुकांनी त्यांच्यावर बहिष्कारहि घातला. पण समाजाच्या या टीकेचे घाव रा. ब. व मालतीबाई यांनी मोठ्या धैर्याने सहन केले. ज्या वेळीं पुनर्विवाह झाला त्या वेळीं रा. ब. फर्स्ट क्लास सबजज्जाच्या हुद्दयावर होते आणि इतक्या अत्युच्च पदावर समाजाच्या टीकेचें शरसंधान होणें ही फार कठीण गोष्ट आहे ही गोष्ट वेगळी; पण त्या पुनर्विवाहित दांपत्याने त्या सर्व टीका अत्यंत धैर्याने सोसल्या.खऱ्या. त्यांच्या या अतुल धैर्याविषयीची सर्व हकीगत त्या वेळच्या मनोरंजनामधून या नवविवाहित दांपत्याच्या छायाचित्रांसह प्रसिद्ध झाली होती ही गोष्टहि कांही खोटी नव्हे.

त्या वेळेपासून मालतीबाई ज्या समाजसुधारक ठरल्या त्या ठरल्याच! रावबहादुरांच्या पगाराच्या आकड्याबरोबरच त्यांचें समाजधुरीणत्वहि वाढत नि पसरत गेलें. आणि हल्ली तर त्या आमच्या आळींतच नव्हे, तर सर्व शहरांत एक प्रतिष्ठित स्त्री म्हणून गणल्या जातात. सभेंत बोलतांना अगर खाजगी संभाषणांत वक्तव्य करतांना त्या आपल्या जुन्या पंचवीस वर्षांपूर्वीच्या पुनर्विवाहाची गोष्ट खुलवून नि रंगवून सांगितल्याशिवाय राहत नाहीत, आणि वेळ सापडेल तेव्हा जुन्या समाजाच्या आकुंचित दृष्टिकोनाबद्दल व त्यांनी तेव्हा सोसलेल्या हालअपेष्टांबद्दल अनाहूत माहिती सांगितल्याशिवाय सहसा सोडत नाहीत. स्त्रीस्वातंत्र्य हा त्यांचा आवडीचा विषय आहे व त्या विषयाचें प्रतिपादन त्या वसंत व्याख्यानमालेंत एखादे वेळीं उपवक्त्या म्हणून बोलतात तेव्हा मोठ्या हिरिरीने करतात.

मालतीबाई सुधारक आहेत आणि श्रीमंत सुधारक स्त्रियांच्या अवतीभोंवती नेहमी घोटाळत असलेल्या वनितासमाज अगर महिलामंडळ इत्यादि संस्थांना त्यांचा अगदी उदार आश्रय आहे. महिलामंडळांत गेल्याशिवाय नि बॅड-मिंटन खेळल्याशिवाय त्यांना मुळीच करमत नाही. प्रत्येक स्त्रीने अक्षय्य तारुण्य टिकविण्याकरिता शुद्ध हवेंत खूप खेळलें पाहिजे व व्हिटॅमिनयुक्त भाजीपाले भरपूर खाल्ले पाहिजेत असें त्यांचें अगदी छापील मत आहे व त्या मताप्रमाणे त्या वागतातहि.

'स्त्रीस्वातंत्र्य' हा त्यांचा आवडीचा विषय आहे व त्या विषयाचें प्रात्यक्षिक दाखविण्यास त्यांच्या दोन मुलींच्या रूपाने त्यांना खूप वावहि आहे. मालतीबाईंना एकंदर दोन मुली– नलिनी आणि मालिनी. श्रीमान् सुशिक्षित समाजसुधारकाच्या मुली त्या, तेव्हा त्या सुधारणामय वातावरणांत वाढलेल्या असणारच. मालतीबाईंनी त्यांना पूर्ण स्वातंत्र्य आणि मोकळीक दिलेली आहे व थोड्याच दिवसांत त्यांचें एखाद्या श्रीमंत आणि सुशिक्षित आय्. सी. एस्. अगर बॅरिस्टरशीं लग्न लागून– प्रेमविवाह जमवून देऊन– सुधारणेचें अत्युच्च शिखर गाठण्याचा त्यांचा मानसहि होता. पण त्यांचे ते बेत हवेंतल्या हवेंतच जिरून गेले.

त्यांच्या थोरल्या मुलीने– नलिनीने– प्रेमविवाहच केला; पण तो मालतीबाईंच्या इच्छेनुसार एखाद्या आय्. सी. एस्.शीं न करतां एका बी. ए.,

बी. टी. मास्तरशीं केला. मुलीने या मूर्तिमंत दरिद्र्याशीं विवाहबद्ध होऊं नये, तिला 'लाइफ'मध्ये इतर खूप 'चान्सेस' मिळण्यासारखे आहेत असें रा. ब. बाईंचे मत होतें आणि तें मत नलिनीवर जबरदस्तीने लादण्याचा त्यांनी त्या वेळीं खूप प्रयत्न केला. पण व्यर्थ ! तो विवाह व्हायचा तो झालाच !

मालिनीने तर त्यापेक्षाहि घोर अपराध केला ! गेल्या नऊ ऑगस्टच्या चळवळींत तिने कॉलेजवर निरोधन केलें. ती मिरवणुकींत सामील झाली व गुप्त पत्रकें काढण्यासहि तिने मागें घेतलें नाही. या कृत्यांबद्दल पोलिसांनी जेव्हा तिला धरून नेलें आणि सहा महिन्यांची शिक्षा ठोठावली तेव्हा मालतीबाईनी आकाशपाताळ एक केलें व मालिनीला शिव्याशाप मोजले. स्त्रीस्वातंत्र्याचा हा अर्थ त्यांना माहीत नसावा. कदाचित् पंचवीस वर्षांपूर्वी त्यांनी एका शुभ घटकेला पुनर्विवाह केला, त्यानंतर हें जग तसेंच राहिलें, त्यांत कांही पालटच झाला नाही अशी त्यांची समजूत असावी. स्त्रीस्वातंत्र्य म्हणजे बॅडमिंटन खेळणें, सामाजिक विषयावर वनितासमाजांत बोलणें व गावांतून सायकलीवरून धीटपणाने हिंडणें, एवढेंच त्या समजत होत्या. पण मालिनीने दाखविलेल्या स्त्रीस्वातंत्र्याच्या विश्वरूपदर्शनाने त्यांच्या डोळयांपुढे अंधारी आली !

अजूनहि मालतीबाई वसंत व्याख्यानमालेंत स्त्रीस्वातंत्र्यावर व्याख्यानें देतात, मासिकांतून लेख लिहितात आणि संभाषणांत स्वतः केलेल्या पुनर्विवाहाबद्दल गौरवाने बोलतात. त्यांचें हें संभाषण ऐकून हल्ली इतर बायका बाह्यतः कौतुकाने, पण अंतर्यामीं उपहासाने हसतात व त्यांपैकी ज्या धीट आहेत त्या एकमेकींना विचारतात, " मालतीबाई सुधारणावादी व स्त्रीस्वातंत्र्यवादी खऱ्या; पण मग त्यांनी नलिनी व मालिनीने दाखविलेल्या स्वातंत्र्याबद्दल इतकें अकांडतांडव कां करावें ? " आणि हा प्रश्न अजून कोणालाच सुटलेला नाही !

मालतीबाई कीर्तन्यांचा वाडा सोडून तुम्ही दोन-चार घरें सोडून पुढे आलांत की तुम्हांला हिरव्या रंगाचें प्रशस्त तिमजली घर लागेल. आणि त्या घरांत जर तुम्हीं सहज डोकावून बघितलें तर " कु. शांताबाई दिवेकर, बी. ए., बी. टी." अशी पाटी तुमच्या दृष्टिपथांत येईल. कुमारी म्हटली की तारुण्याने, सौंदर्याने नि जीवनरसाने मुसमुसलेली अशी एखादी तरुण स्त्री

माझे वाचक खात्रीने मनापुढे चितारतील. पण त्यांनी आपली ही कल्पना निदान या बाबतींत तरी चालवून बघूं नये. त्यांना पश्चात्ताप झाल्याशिवाय राहणार नाही.

उंच, किडकिडीत आणि अशक्त आकृति, पांढुरका वर्ण, निस्तेज पण टपोरे नेत्र आणि चेहऱ्यावर किंचित् चिडखोरपणाची व त्रासिकपणाची छटा अशी शांताबाईंची बाह्याकृति आहे. एके काळीं त्या कदाचित् फार सुंदर नि आकर्षक असतील; पण आज त्यांपैकी कांहीहि राहिलेलें नाही हें निश्चित. स्त्री अगदी कितीहि सुंदर जरी असली तरी वयाच्या छत्तिसाव्या वर्षांत पदार्पण करणाऱ्या अविवाहित मास्तरणीच्या बाबतींत सौंदर्य तरी टिकाव कसा धरून राहील? वर्षाऋतूंत जीवनरसाने फोफावलेल्या सरितेचें पात्र उन्हाळ्यांत आटून नाही का जाणार? शांताबाईंच्या स्वरूपाविषयी अगदी तसेंच म्हणतां येईल.

शांताबाई एका श्रीमान्, समाजसुधारक प्राध्यापकांची एकुलती एक कन्या. पंचवीस वर्षांच्या विकृत सुधारकी वातावरणांत त्या वाढलेल्या. स्त्रियांना कॉलेज-शिक्षण दिलेंच पाहिजे या मताचा तिचे वडील अत्यंत हिरीरीनें पुरस्कार करीत. त्या मताचें प्रात्यक्षिक म्हणजेच शांताबाईंचें कॉलेज-शिक्षण होय. पंचवीस वर्षांपूर्वीच्या 'सफ्रेजेट' चळवळीचा व स्त्रीस्वातंत्र्यविषयक मतांचा त्या वेळच्या शांतावर फारच परिणाम झाला आणि कसें कोणास ठाऊक, त्यांनी दोनतीन मैत्रिणींसमवेत लग्न न करण्याची– आजन्म अविवाहित राहून पुरुषांशीं झगडा करण्याची खडतर प्रतिज्ञा केली! लग्नाची बेडी, जुलुमी पुरुषजात, स्त्रीचें दास्यत्व इत्यादि शब्द मग त्यांच्या संभाषणांतून वारंवार यायला लागले. त्या वेळीं कॉलेजांतील विवादसभेंत बोलतांना अगर मासिकांतून लेख लिहितांना पुरुषवर्गाला जळजळीत भाषेंत शिव्या दिल्याशिवाय त्या कदापि राहत नसत.

असेच दिवस गेले. शांताबाईंनी योग्य काळीं बी. ए.ची पदवी घेतली. बी. ए. झाल्यानंतर बी. टी. ओघानेच आलें. आणि बी. टी. झालें की समाजकार्य म्हणून बाह्यतः, पण मुख्यत्वेंकरून वेळ घालविण्याकरिता, मुलींच्या शाळेंतील मास्तरणीची नोकरीहि आली. त्या काळच्या सुशिक्षित स्त्रीजीवनाच्या पायऱ्या याप्रमाणे त्यांनी ओलांडल्या; पण लग्नाची बेडी अडकवून

घेतली नाही. दोनतीन योग्य तरुणांनी त्यांचें प्रियाराधन करण्याचा प्रयत्न केला; पण शांताबाईंनी त्या सर्व प्रयत्नांना धुडकावून लावलें व आपलें समाज-सेवा करण्याचें– म्हणजे मुलींच्या शाळेंत मास्तरकी करण्याचें– व्रत पुढे अखंड चालविलें.

कालांतराने त्यांच्यांतील तारुण्य संपलें, तोंडावरील टवटवी खलास झाली आणि त्यांचें सौंदर्य ही इतिहासकालीन गोष्ट झाली. त्यांचें प्रियाराधन करणारे, त्यांच्यासाठी झुरणारे तरुण दुसऱ्या तरुणींकरिता झुरूं लागले व त्यांचें यथा-वकाश लग्न होऊन त्यांचे संसार आता ऐन मध्यावर आले आहेत. लग्न न करण्याच्या शपथा घेतलेल्या त्यांच्या मैत्रिणी आता योग्य वरांबरोबर सुखा-समाधानाने संसार करीत आहेत.

शांताबाईंना आता कधी कधी एकटें– एकाकी वाटतें. अंतर्मनांत कधी कधी पश्चात्तापाची झुळूकहि चोरपावलांनी येऊन जाते. लेख लिहिण्याचा व व्याख्यानें देण्याचा त्यांना आता कंटाळा आला आहे. शाळेंतील मुलींच्या हसण्याखिदळण्याला त्या पूर्वी ‘गोड किलबिलाट’ म्हणून संबोधीत; पण त्याच गोड किलबिलाटाची त्यांना आता शिसारी आली आहे. आमच्या आळींतील कांही कुचेष्टेखोर लोकांनी त्या एका श्रीमान् सपत्निकाशीं द्वितीय विवाह करून सुधारणेचें पैलतीर गाठण्याच्या विचारांत आहेत अशी कंडी उठवून दिली आहे; व तसा योग आल्यास जी एक प्रचंड बौद्धिक अन् वैचारिक चकमक आमच्या आळींतील सुधारक आणि सनातनी लोकांत होणार आहे, त्याकरिता आतापासूनच प्रत्येक पक्षाने ‘बौद्धिक भूक’, ‘वैचारिक पातळी’, ‘एकपत्नीत्व’, ‘धर्मे च अर्थे च नातिचरामि’ इत्यादि शब्दांचा दारूगोळा आपापल्या कोठारांत भरून ठेवला आहे.

तें कांहीहि असो, पण मला मात्र या स्त्रीची मनस्वी कीव वाटते. संध्या-काळच्या वेळीं शाळा सुटली की एका हातांत पुस्तकें नि दुसऱ्या हातांत छत्री घेऊन लासिक मुद्रेने त्या आमच्या आळींतून चालल्या की कित्येक तरुण अवखळ पोरें त्यांची चेष्टा करतात, तर आजूबाजूच्या स्त्रिया त्यांची कीव करतात. त्या सगळ्यांच्या चेहऱ्यांकडे बघून कु. शांता दिवेकर, बी. ए., बी. टी., या मनांत नक्की म्हणत असतील, “ माझ्या आयुष्यांत मीं कमावलें तरी काय ? समाजकार्याच्या निमित्ताने मी जन्मभर अविवाहित राहिलें आणि

मनाची वंचना केली. मोहापासून लांब राहण्याच्या ईर्षेने शरीराला अक्षम्य नि मनस्वी त्रास दिला. पण समाजकार्य तरी माझ्या हातून काय घडलें? समाजकार्य म्हणजे मुलींचे इंग्रजी निबंध तपासणें आणि मराठी कविता सुस्वर नि मंजुळ स्वरांत गाऊन दाखविणें हेंच की काय? आणि पुरुषांच्या जुलुमा-पासून मी स्त्रियांना मुक्त करणार होतें ना? मग मींच माझ्या शाळेंतील अधिकारीवर्गाच्या जोखडाखाली मान कशी अडकविली?" असल्या तऱ्हेचे विचार मनांत घोळवीत मार्ग आक्रमण करतांना पाहून त्यांच्याविषयी कुणाला-हि कीव येईल. पण आता उपयोग काय?

शांताबाईंचें हें चित्र म्हणजे पंचवीस किंवा तीस वर्षांपूर्वीच्या सुधारक स्त्रीचा नमुना आहे. पुरुषजातीला शिव्या देणारी आणि लग्नबंधनांना त्याज्य मानणारी त्या वेळची सुशिक्षित स्त्री वस्तुतः भित्री होती. पुरुषांच्या नजरेला नजर भिडविण्याची, त्याच्या सहवासांत येऊन त्याच्यावर मात करण्याची तिची लायकी नव्हती. म्हणूनच ती पुरुषजातीपासून लांब लांब पळे आणि दुरूनच त्याला शिव्याशाप देई व त्याच्या नांवाने बोटें मोडी.

पण हल्लीच्या सुधारक स्त्रीचें तें चित्र खास नव्हे. हल्लीची स्त्री पुरुषांपासून लांब पळणार नाही; तर त्याला आपल्याभोवती घिरट्या मारण्यास भाग पाडील. आपल्या सौंदर्यानें, तारुण्याने नि व्यक्तिमत्वाने घायाळ झालेल्या पुरुषजातीची शिकार करणें तिला खात्रीने आवडेल. आणि या धर्तीची तरुण स्त्री बघावयाची झाल्यास तुम्हांला आमच्या आळींतलि रत्नमाला दांडेकरशीं परिचय करून घेतला पाहिजे. निदान तिला नुसतें डोळ्यांखालून तरी घातलें पाहिजे.

कु. रत्नमाला दांडेकर ही मुलगी आमच्या आळींतील तरुणांत मोठी लोकप्रिय आहे यांत शंका नाही. शाळा-कॉलेजांतील प्रौढ विद्यार्थी संध्या-काळीं हिंडावयास जातांना एकदा तरी दांडेकरांच्या वाड्यावरून चक्कर टाकल्याशिवाय राहत नाहीत. त्यांच्या खाजगी संभाषणांत रत्नाबद्दल निर-निराळ्या तऱ्हेचे उल्लेख आले नाहीत असा सहसा एकहि दिवस जात नसावा. आणि रत्ना आहेहि तशी सुंदर आणि लोभनीय. गोड कमनीय आकृति, खोडकर डोळे, सतेज अंगकांति आणि चेहऱ्यावरील बालिश नि सौंदर्यपूर्ण हावभाव यांमुळे ती आसपासच्या मुलींच्या घोळक्यांत नक्की उठून

दिसते. निसर्गाने दिलेल्या या सौंदर्याचें पालनपोषण करण्यांत, त्याचा आकर्षक– स्पष्टच सांगायचें म्हणजे भडक रीतीने– उठाव करण्यांत रत्ना सदैव दंग असते. ती कधी आपल्या केसांचा सैलसा आंबाडा बांधून त्यावर एखादें टपोरें पिवळ्या गुलाबाचें सपर्ण फूल ठेवून देईल, तर कधी मीनाक्षी छापाच्या दोन वेण्या पाठीवर सोडून मोकळेपणाने हिंडेल. तिला पातळें किती आणि कोणत्या रंगाचीं आहेत याविषयी चर्चा करण्यांत कांही अर्थ नाही. आमच्या आळींतील तरुण मुलांची त्या महत्त्वाच्या विषयावर रात्रंदिवस चर्चा नि वादविवाद चाललेलेच असतात.

जीवनांत ध्येय किंवा गांभीर्य या मुलीच्या बाबतींत तरी सहसा कधीं यायचें नाही असें मला वाटतें. वयाला आता अठराच्या वर वर्षें होऊन गेलीं; परंतु स्वभावांतील सखोलता अगर विचारशीलत्व यांचा अजून पत्ता नाही ! आणि विचार तरी कसला करायचा ? बापाची बऱ्यापैकी सांपत्तिक स्थिति आणि घरांतील अवास्तव स्त्रीस्वातंत्र्य, या वातावरणांत दुःखाची झळ लागायची कशी ? आणि दुःख अगर दारिद्य नाही तर जीवनांत सखोलता यायची तरी कशी ?

बाकी स्वतः रत्नमालेच्या बाबतींत विचारशीलत्व नसलें तरी तिच्या रमणीय आकृतीने, खेळकर स्वभावामुळे व बोलण्यांतील लाडकेपणामुळे तिने अनेक तरुणांना अतिविचारी केलें आहे हें खास. तिचे वडील स्वतःला पुरोगामी स्त्रीस्वातंत्र्यवादी समजतात. स्त्रियांनी पुरुषांत खूप मिसळल्याशिवाय हिंदुस्थानचें पारतंत्र्य संपायचें नाही हें त्यांचें अगदी ठाम आणि ठरीव मत आहे. आणि या मतानुसार वागून तरुण मुलांना नादीं लावण्याचें, प्रेमाचीं लटकीं नि बालिश प्रकरणें उपस्थित करण्याचें स्वातंत्र्य तिने अगदी अव्याहत-पणें उपभोगलें आहे. आजपर्यंत तिने खरेंखुरें प्रेम कोणावर केलें आहे हें सांगणें कठीण आहे. पण हिच्यावर प्रेम करून शेवटीं निराश झाल्यामुळे आयुष्याचा उन्हाळा करणारे एक सालस पदवीधर शिक्षक मला माहीत आहेत. आणि हिच्याकरिता उसासे टाकून, हिच्या खोट्या वचनांवर विश्वास ठेवून, स्वतःचें कॉलेज-शिक्षण अपुरें सोडलेला आणि 'दिव्य' व 'उदात्त' प्रेमाची स्मरणी घेतलेला एक वेडसर कॉलेज-तरुण आमच्या आळींतून अजून-हि हिंडत आहे, स्वतःच्या वागणुकीमुळे इतक्या लोकांच्या आयुष्याचा खेळ-

खंडोबा झाला याबद्दल तिला खंत अगर लाज अशी बिलकुल वाटत नाही. उलट नर-कपालांची माळा गळ्यांत घालून हिंडणाऱ्या एखाद्या राक्षसिणी-प्रमाणे ती अजून कॉलेजांतील तरुण मुलांच्या घोळक्यांत हिंडत आहे, त्यांना नादीं लावीत आहे व प्रीतिस्वातंत्र्यावर मतें देत आहे! हिच्या जीवनांतील हा तारुण्योन्माद केव्हा संपेल कुणास ठाऊक! पण तोंपर्यंत तरी ती निदान एकदोन तरुणांच्या आयुष्याचा खेळखंडोबा केल्याशिवाय राहणार नाही हें अगदी नक्की!

हा जसा गेल्या दहाबारा वर्षांपूर्वीच्या सुशिक्षित नि पुरोगामी स्त्रीचा नमुना तुम्हीं बघितला तसाच आणखी एक नमुना तुम्हीं एकदोन घरें टाकून पुढे गेल्यानंतर तुम्हांला दिसेल. आमच्या आळींतील नव्या पिढींतील कार्य-क्षम नि चळवळ्या स्त्रियांत यांचा समावेश होतो– निदान तो तसा व्हावा असा त्यांचा अट्टाहास आहे. त्यांचें नांव आहे कु. भानुमती चिपळूणकर. घरची सांपत्तिक स्थिति साधारण बऱ्यापैकी व वडिलांना राजकारणाचा साधारण नाद. त्यामुळे गावांतील राजकारणी लोकांचा– राजकारणांत भाग घेणाऱ्या तरुण लोकांचा घरांत– सदैव अड्डा असतो. कुणाला वेदान्तावर चर्चा करणें आवडतें, तर कुणी संगीतावर अगर नाटकावर नेहमी चर्चा करतात. त्यांपैकीच हिचे वडील आहेत. गृहस्थ आपला सदा राजकारणावर चर्चा करीत असतो. कोणत्याहि राजकीय प्रश्नावर निष्क्रिय आणि शाब्दिक बडबड करणें हा त्यांच्या हातचा मळ आहे.

याच घरगुती वातावरणांत भानुमती तयार झाली आहे. स्वतःला राज-कारण कळतें अशी हिची वेडी आणि भ्रामक समजूत आहे. राजकारणावर गप्पा मारण्याचें व मतें झोकून देण्याचें व्रत हिने वयाच्या पंधराव्या वर्षा-पासूनच उचललें आहे. ज्या वयांत मुलींनी शाळेंत हुतुतू-हमामा घालायचा, एकमेकींची थट्टा नि मस्करी करायची त्याच वयांत हिने हिंदी राजकीय चळ-वळीवर मतें द्यावींत हें विचित्र नव्हे का? इंग्रजी पांचवींत असतांनाच हिने कोणत्या तरी समाजसत्तावादी अभ्यासमंडळांत प्रवेश करून घेतला आणि मग अभ्यासमंडळांत कानांवरून जाणाऱ्या 'बूझ्वा', 'प्रतिगामी वर्ग', 'पिंळला जाणारा दलितवर्ग' अगर 'श्रमशक्ति' इत्यादि शब्दांचा तिने घरांत नि मैत्रिणींत इतका गाजावाजा केला, की तिच्या मैत्रिणींचे कान किटून गेले! पण त्याचें

तिला विशेष कांही वाटलें नाही. एखादे दिवशीं तुम्ही तिला रस्त्यांत बघाल तर हातांत मार्क्सवादावरील मोठमोठीं– तिच्या शरीराला व मनाला न पेलणारीं अशीं पुस्तकें घेऊन ती जात असतांना तुम्हांला दिसेल. तिची आणि तुमची ओळख झाली तर राजकारणावरील तिच्या व्याख्यानबाजीने ती तुम्हांला भंडावून सोडल्याशिवाय राहणार नाही.

या मुलीचें पुढे काय होणार आहे हेंच मला कळत नाही ! स्वतःचें मन नि शरीर अपरिपक्व अवस्थेंत असतांना त्यांना न पेलणारे विषय बोलून या मुलीने आपल्या जन्माची थोडीफार नासाडी केली आहे असें मी तरी म्हणेन. विद्यार्थिनींनी राजकारणांत पडण्यास हरकत नाही; पण तें राजकारण इतकें सवंग होऊं नये. पोरासोरांच्या आणि पोरीबाळींच्या हातांत जाऊन त्या राजकारणाची नासाडी होऊं नये असें मला वाटतें. त्यामुळे विद्वत्तेची ऐट आणून ती मुलगी आमच्या दारावरून जायला लागली की तिला थांबवून म्हणावेंसें वाटतें, “ वेडे मुली, राजकारणाशीं– जिवंत जळत्या राजकारणाशीं– तूं ही काय थट्टा मांडली आहेस ? राजकारण करणं म्हणजे नुसतं स्टडी सर्कलला जाणं, समाजसत्तावादावर निष्क्रिय चर्चा करणं आणि कॅपिटल अगर कम्युनिस्ट मॅनिफेस्टो हे ग्रंथ नुसते हातांत घेऊन हिंडणं असंच तूं समजतेस काय ? जे ग्रंथ तूं हातांत घेऊन हिंडतेस त्या ग्रंथांतील एखादा तरी विचार ग्रहण करण्याची कुवत तुझ्या मेंदूमध्ये आहे का ? मग तूं हा पोरखेळ कशासाठी मांडला आहेस ? त्यापेक्षा हे सारे थेर सोडून देऊन इतर चार मुलींसारखी वागलीस तरी विशेषसं वावगं होणार नाही.” अशा तऱ्हेचा सदुपदेश करण्याचे विचार माझ्या मनांत फार वेळां येतात. पण त्या ‘राजकारणी’ स्त्रीला माझ्यासारख्या एका सामान्य कारकुनाकडून विचार ऐकून घेणें कदाचित् आवडणार नाही असें वाटून मी माझ्या तोंडाला लगाम घालतों.

मीं आता वर दाखविलेल्या स्त्रियांपैकी सर्व स्त्रिया स्वतःला शिष्ट आणि पुरोगामी समजतात हें उघड आहे. स्त्रीस्वातंत्र्याकरिता, समस्त स्त्रीजातीच्या ऐहिक उन्नतीकरिता आपण झटत आहोंत अशी त्यांची कल्पना आहे; व तीच कल्पना इतरेजनांनी मनांत बाळगावी नि रुजवावी असा त्यांचा अट्टाहास आहे. पण या सर्व स्त्रिया वास्तववादी नाहीत, आजतागायतच्या महा-

राष्ट्रांतील स्त्रीजीवनाशीं निगडित नाहीत, असें नाही तुम्हांला वाटत? पुनर्विवाहाबद्दल कौतुक करण्याचे आणि व्याख्यानें देण्याचे दिवस आता संपले हें न ओळखणाऱ्या रावबहादुरीणबाई, स्त्रीस्वातंत्र्य म्हणजे पुरुषद्वेष नव्हे हें न उमजणाऱ्या मास्तरीणबाई, अगर पुरोगामी जीवन म्हणजे दिसेल त्या पुरुषाच्याभोवती रुंजी घालणें, त्याला नादीं लावणें व स्वतःच्या बेजबाबदार वागणुकीने अनेकांच्या आयुष्याची नासाडी करणें नव्हे हें न समजणारी रत्नमाला दांडेकरसारखी मुलगी— या स्त्रिया हल्लीच्या महागाईने नि युद्धजन्य परिस्थितीने गांजलेल्या महाराष्ट्रांतील स्त्रियांच्या प्रतिनिधि खास नव्हेत. वडिलांच्या अगर पतीच्या सांपत्तिक सुस्थितीच्या छत्राखाली बसून आणि विश्वविद्यालयाच्या तथाकथित शिक्षणाच्या पांघरुणाखाली स्वतःचें व्यक्तित्व दडवून ठेवून, बाहेरच्या खडतर जीवनाशीं संबंध येऊं न देतां नुसती पुस्तकी तत्त्वांची पोपटपंची आणि चिवचिवाट करणाऱ्या या स्त्रिया नकली आहेत असेंच माझें मत आहे.

तुम्हांला आधुनिक वास्तववादी स्त्री बघायची आहे? प्रचलित महायुद्धामुळे पांढरपेशांतील स्त्रीजीवनावर कोणता क्रांतिकारक परिणाम झाला आहे याची कल्पना करून घ्यायची आहे? ती कल्पना आमच्या आळींतील अगदी कोपऱ्यावरच्या घरांत राहणाऱ्या मुलीवरून करतां येईल.

तिचें नांव कु. बिंदु कुलकर्णी. सकाळच्या वेळीं जर तुम्ही नव्या पुलावर जाल तर हातांत खायचा डबा घेऊन देहू रोडची लोकल गाठण्याकरिता जिवाचा आटापिटा करीत झपाझप पावलें टाकीत जातांना ती तुम्हांला दिसेल. सर्व दिवसभर ती देहू रोडच्या एका मिलिटरी डेपोंत कारकुनाचें काम करते. सकाळीं सातच्या लोकलने देहू रोडला जायचें तें संध्याकाळीं पांच वाजतां दमून, निष्प्राण होऊन परत यायचें हा तिच्या आयुष्यांतील वास्तववादी कार्यक्रम आहे.

बिंदूने देहू रोडच्या डेपोंत नोकरी कां धरली आहे? दहा-पंधरा वर्षांपूर्वी समाजकार्याची तळमळ असणाऱ्या श्रीमंत नि सुशिक्षित मुली मास्तरणीची नोकरी धरीत व स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्यावर चर्चा करीत. पण त्या उद्देशाने बिंदूने ही नोकरी धरलेली नाही. बापाच्या सुस्थितीच्या जोरावर स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याच्या गप्पा मारण्याइतकी फुरसत तिच्या आयुष्यांत सुदैवाने तिला लाभलेली नाही.

तिचे वडील बिचारे एका खाजगी बँकेंत कारकून आहेत. माणूस तसा सनातनी आणि सालस. स्त्रियांनी नोकऱ्या करण्याची कल्पना पूर्वी त्यांना अशुभ वाटे. पुरुषाने मिळवून आणावें आणि स्त्रीने त्याचा संचय करावा आणि उपभोग घ्यावा अशीं त्यांचीं युद्धपूर्वकालीन मतें होतीं. त्या मतानुसार वागून ते स्वतःच्या अल्प प्राप्तींत स्वतः, पत्नी, दोन उपवर मुली व दोन लहान मुलें इतक्यांचा प्रतिपाळ करीत.

पण महायुद्धाचा वणवा पेटल्यानंतर महागाईचा कडाका सुरू झाला. वस्तूंच्या किंमती बेसुमार वाढल्या आणि मध्यमवर्गीतील अल्प वेतनावर कसेबसे चाललेले संसार संपुष्टांत येण्याची वेळ आली. बिंदूच्या वडिलांचीहि अशीच वाताहत झाली ! स्वतःच्या महिना पन्नाससाठ रुपयांच्या प्राप्तीवर इतक्या माणसांचा संसार चालणें अशक्य झालें; पोरेंबाळें उघडीं पडण्याची वेळ आली. पूर्ण विचारांतीं कुलकर्ण्यांनी इंदूला मोठ्या नाइलाजाने नोकरी करण्यास परवानगी दिली. मुलीच्या मिळकतीवर उपजीविका करण्याचें त्या म्हाताऱ्याने मोठ्या नामुष्कीने मान्य केलें, आणि मग बिंदु देहू रोडच्या कारकूनखान्यांत रुजू झाली.

प्रिय वाचक, बिंदूचें आयुष्य तुम्हांला एका दृष्टीने 'क्रांतिकारक' वाटत नाही काय ? आजपर्यंत घरादाराच्या सावलींत वाढलेली स्त्रीजात आता जीवनाच्या धकाधकीच्या सामन्यांत सामील झाली आहे, द्रव्य मिळविण्याच्या खऱ्याखुऱ्या यातायातींत पडली आहे. हीच माझ्या मतें क्रांति आहे. पित्याच्या छत्राखाली राहून निष्क्रिय पोपटपंची करणाऱ्या पूर्वीच्या स्त्रियांपेक्षा बिंदु किती तरी जास्त क्रांतिकारक आहे. निदान घराबाहेरच्या कणखर नि कौतुकरहित जगांत राबून नि घाम गाळून स्त्रियांना यापुढे खरें जीवन समजून येईल असें म्हणण्यास हरकत नाही.

संपली आमच्या आळींतील ठळक स्त्रियांची माहिती. निदान माझ्या मताने तरी या सर्वच स्त्रिया निरनिराळ्या काळांतील मध्यमवर्गीय स्त्रीजीवनाच्या प्रतिनिधि आहेत. मग वाचकांचें मत काय पडेल व या स्त्रियांच्या चित्रांकडे बघून त्यांना कितपत समाधान होईल याची चर्चा आणि काळजी करण्याचें मला काय प्रयोजन ?

# काशीताई ⸺ : ४ :

काशीताई सत्तर वर्षांपूर्वीच्या बालविधवा होत्या. वयाच्या आठव्या वर्षींच त्यांना पतिवियोग सहन करावा लागला आणि त्याचबरोबर साठसत्तर वर्षांपूर्वीच्या बालविधवांच्या कपाळीं लिहिलेले सर्व हाल नि सोपस्कार त्यांना सहन करावे लागले. तेव्हापासून त्यांच्या शरीरावर संन्यासिनीस योग्य अशीं तांबडीं वस्त्रें जीं चिकटलीं तीं पुढे आयुष्याच्या साठ वर्षांच्या सर्व प्रवासभर तशींच होतीं. शिक्षण नाही, खोट्या धर्मभावनांचा पगडा मनावर बसलेला आणि ज्यांत जीव गुंतून आयुष्यांत रस उत्पन्न होईल असें एखादें ठिकाणहि नाही. या सर्व परिस्थितींत त्यांना आयुष्य म्हणजे एक भीषण तुरुंगवास, जन्मठेप, अंदमानाची शिक्षा वाटली असल्यास नवल नाही. परंतु काशीताईंनी आयुष्याची जन्मठेप आनंदाने भोगली; नव्हे, ती भोगीत असतांनाच आपल्याभोवतालच्या छोट्या जगांत थोडी फार सत्ता गाजवली. आणि घरगुती वातावरणांत का होईना, आपलें महत्त्व मरेपर्यंत अबाधित ठेवलें.

तशी त्यांच्या घरची श्रीमंती होती. सासरचें घराणें सुप्रसिद्ध तर होतेंच; परंतु संसारसुखाबरोबरच त्यांनी सासरच्या श्रीमंतीवर व मानमान्यतेवर पाणी सोडलें. परंतु त्यांचें माहेर कांही कमी श्रीमंत नव्हतें. वडिलांची वऱ्हाडांत डिस्ट्रिक्ट जज्जाच्या जागेवर बढती आणि सख्ख्या भावाची भारी पगाराची मानमान्यतेची नोकरी, यांमुळे त्यांना पैशाअडक्याची तमा न बाळगतां एक प्रकारच्या उमरावी थाटांत राहतां आलें असतें. आणि इतर अनेक

बालविधवांप्रमाणे वेदान्ती निरर्थक गप्पांमध्ये काळ सहज कंठतां आला असता. परंतु त्यांनी कधीहि कोणत्याहि मठांत जाऊन वेदान्ती फड गाजवले नाहीत. जीवनाबद्दल, जीवनांतील प्रत्येक अंगोपांगाबद्दल त्यांना एक प्रकारची आसक्ति होती. आणि त्या आसक्तीकरिता, प्रेमाकरिता त्या जीवनांत संसारी माणसाप्रमाणे वागत होत्या. स्वतःचा संसार नाही तर भावाचा, भावाच्या मुलांचा संसार त्यांनी स्वतःचा समजला होता; आणि तो संसार सुखावह व कीर्तिप्रद होण्याकरिता आयुष्याचीं साठसत्तर वर्षें कणाकणाने अक्षरशः त्या झिजत होत्या.

भाऊ नोकरीनिमित्त वऱ्हाडांत असे. आणि पुण्याच्या नारायण पेठेंतील वाड्याची व्यवस्था काशीताई चोख रीतीने बघत असत. नवीन बिऱ्हाडें बघणें, वाड्याची सर्व व्यवस्था जातीने पाहणें, बिऱ्हाडकरूंचीं भांडणें तोडणे व बिऱ्हाडकरूंच्या नवथर बायकांना शिस्त लावणें— या गोष्टी तर त्या एखाद्या पुरुष माणसाच्या मदतीशिवाय बिनबोभाट पार पाडीत. परंतु भावाचीं मुलें जीं शाळेकरिता पुण्यास राहत असत त्यांची हरतऱ्हेची व्यवस्था बघणें, त्यांच्या खाण्यापिण्याची, कपड्यालत्त्यांची यत्किंचितहि आबाळ न होऊं देणें हीं कामेंसुद्धा त्या तन्मयतेने आणि संसारी माणसाच्या कुशलतेने पार पाडीत.

पण हीं सर्व कामें पार पाडतांना त्यांच्यांत अशिक्षित बायकांचा वेंधळेपणा मुळीच नव्हता. सर्व गोष्टी वेळच्या वेळीं करण्याबद्दल त्यांचा जबरदस्त कटाक्ष होता. आणि त्यांनी आपल्या दीर्घ आयुष्यांत या नियमितपणाविषयी इतका काटेकोरपणा दाखविला होता, की वेळच्या वेळीं कामें करण्याची त्यांना जशी सवय लागली होती तद्वतच त्यांची ती शिस्त आणि नीटनेटकेपणा पाहण्याची त्यांनी आम्हां आजूबाजूच्या लोकांनासुद्धा सवय लावली होती.

लवकर कामाचा गाडा उरकण्याची त्यांना जणू घाई झालेली असायची. संध्याकाळीं साडेपांच-सहा झाले की त्यांची चूल पेटायची. दिवेलागणीला सर्व मुलांनी घरांत आलेंच पाहिजे आणि सात साडेसातच्या आंत जेवणें उरकून माडीवर अभ्यासाकरिता गेलें पाहिजे हा त्यांचा विचित्र दंडक असे. संध्याकाळच्या जेवणाला कुणीं उशीर केला की त्यांचा पारा एकदम चढे. मग दम्यामुळे किंचित् चिरक्या बनलेल्या आवाजाने अपराध्यावर शिव्यांचा,

अपशब्दांचा आणि धमक्यांचा वर्षाव होई तो इतका, की उशीरा येणारी ती अपराधी व्यक्ति पुन्हा तो गुन्हा करण्यास धजावत नसे. मुलें जोंपर्यंत लहान होतीं आणि परसांतल्या परसांत चालणाऱ्या कापडी चेंडूवरच त्यांची तहान पूर्णपणें भागत असे तोंपर्यंत या नियमाचें विशेष उल्लंघन होत नसे. परंतु त्यांचा एक भाचा पुढे कॉलेजमध्ये गेला आणि त्याला जेव्हा हिंडण्या-फिरण्याची चटक लागली तेव्हा त्याला दररोज उशीर होऊं लागला व ठरलेल्या कामांत बदल झाल्यामुळे रागावलेल्या काशीताईचे शिव्याशाप दररोज जास्त मोकळया मनाने बाहेर येऊं लागले. त्या वेळेला पुण्याला नवीन रेल्वे-पूल बांधला जात होता. आणि माझ्या आठवणीप्रमाणे ती एक फिरण्याची जागा त्या वेळीं जास्त लोकप्रिय होती. लॉइड ब्रिजला— कशावरून कुणास ठाऊक, काशीताईच्या कोशांत 'शेकसल्ला ब्रिज' असें नांव पडलें होतें. संध्या-काळीं आठ साडे-आठच्या सुमारास जेव्हा तो कॉलेजांतला भाचा धडधडत्या अंतःकरणाने दारांत पाऊल टाकी तेव्हा "हे आले शेकसल्ला! तुम्हांला वेळे-वर घरीं यायला तुमच्या बापाचे चार चव्वल खर्ची पडतात की काय?" इत्यादि वाक्यांनी ताडण सुरू होई आणि सर्व वाडा दणाणून जाई. थोड्या फार उनाडपणाने वागणाऱ्या मुलाचें 'शेकसल्ला' हें नांव इतकें बसून गेलें होतें आमचें, की अजूनहि असा मुलगा बघितला की 'शेकसल्ला आहे झालं' असे उद्गार काढण्याचा मोह मला जबरदस्त होतो.

मुलें हीं जशीं त्यांनी अगदी प्रेमाने जवळ बाळगलीं आणि त्यांचें मोठ्या नेटाने संगोपन केलें, त्याचप्रमाणे दुसऱ्या एका वस्तूवर त्यांचें अतोनात प्रेम आणि भक्ति होती. ती म्हणजे त्यांचा तो जुनाट पेशवाई वाडा. त्या वाड्याची त्यांनी चाळीसपन्नास वर्षें इतकी मनोभावाने सेवा केली, की तेवढी जर परमेश्वराची केली असती तर खात्रीने पुण्याचे रांजण चित्रगुप्ताच्या कोठारांत त्यांच्या नांवें जमा झाले असते.

सकाळीं उठलें की मागच्या दारचें सडासंमार्जन, नंतर मोऱ्या आणि गटारें यांची स्वहस्तें सफाई, दुपारीं सर्व वाडा मोलकरणीकडून स्वतःच्या देखरेखीखाली झाडून घेणें, रात्रीं अंधार वाटूं नये म्हणून ठिकठिकाणीं ठेवलेले स्वच्छ काचेचे दिवे, अशी त्यांची सेवा करण्याची पद्धत होती. आणि ती सेवा त्यांनी जवळ जवळ तीस-चाळीस वर्षें अव्याहत चालविली होती. मी

त्यांच्या वाड्यांत जवळ जवळ वीस वर्षें होतों; परंतु सकाळीं परसांत गेलों असतांना पायाला सडासंमार्जित भूमि लागली नाही आणि तीवर रांगोळयांच्या ठिपक्यांनी 'श्रीराम' हीं मनोहर अक्षरें काढलेलीं दिसलीं नाहीत असा एकहि प्रभातकाल मला स्मरत नाही. मुलांच्या कपड्यांकडे जितकें त्यांचें लक्ष असे, तितकेंच किंबहुना त्यापेक्षाहि जास्त वाड्याच्या शाकारणीकडे त्यांचें लक्ष असे. आणि दिवाळीचे दिवस जवळ आले की, हौसेने चार पदार्थ करण्याची त्यांची धडपड असे, त्यापेक्षा वाड्याला रंगरंगोटी करण्याचा कटाक्ष जास्त तीव्र असे.

वाड्यांतल्या बिऱ्हाडकरूंच्या स्वच्छतेवर त्यांचा विशेष कटाक्ष. मुलांनी दारावर खडूच्या रेघा ओढलेल्या, पुरुषांनी भिंतीवर पानतंबाखूच्या पिचकाऱ्या मारलेल्या आणि मोलकरणींनी मोरींत राखेची घाण करून ठेवलेली त्यांना मुळीच चालत नसे. असें कांही झालें, की त्या आपपरभाव विसरून वाटेल त्यावर तोंड टाकीत आणि वाटेल त्या मुलाचा कान उपटायला कमी करीत नसत. एकदा त्यांनी बिऱ्हाडांतल्या एका मुलाचा खडूच्या रेघा ओढल्याबद्दल कान पिरगळला. पुढे मुलाच्या बापाने वाडा सोडला व तें बिऱ्हाड दुसऱ्या वाड्यांत गेलें. पुढे कांही दिवसांनी त्या गृहस्थांनी अत्यंत आदराने आपल्या नव्या घरीं त्यांना बोलावलें. काशीताई गेल्या तों दारापासून माडीपर्यंत जिकडे तिकडे पोरांनी खडूचीं अक्षरें काढलेलीं त्यांना दिसलीं. त्यांना बसण्याकरिता जो पाट दिला होता त्यावरसुद्धा कोणत्या तरी चिमुरड्याने 'काशीताई' हीं अक्षरें गिरविलीं होतीं. कांही वेळाने तो गृहस्थ जरा मिस्किलपणाने म्हणाला, "इकडे आल्यापासून एक खर्च कमी झाला. आमच्या मुलांना आता पाट्या घ्यायला नकोत. सगळीं दारं नि खिडक्या आता पाट्याच झाल्या आहेत !" यावर काशीताई कांही बोलल्या नाहीत. परंतु स्वच्छतेकरिता बिऱ्हाडकरूंच्या मुलांना बोलण्याचें त्यांनी थोडें फार बंद केलें.

त्यांचा दुसरा मोठा गुण म्हणजे सुग्रणपणा. निरनिराळे प्रसंग साधून स्वतःच्या घरीं जेवणावळी घडवून आणायच्या, अनेक लोक जेवायला बोलवायचे आणि त्याकरिता पहाटे दोनतीन वाजल्यापासून अविश्रांत राबायचें याची त्यांना एक प्रकारची आवड होती. सोप्यांत पंगती बसल्या आणि स्वतः केलेल्या पक्वान्नांचा निमंत्रित लोकांनी फडशा पाडला, की त्यांना समाधान

होई. आप्तेष्टांत किंवा शेजाऱ्यापाजाऱ्यांत कांही लग्नकार्य निघालें, की भोजन-समितीच्या प्रमुखत्वाची सुपारी बहुधा काशीताईंना देण्यांत येई. काशीताई असल्या की जेवणावळीची चिंता बाळगायला नको. ती अगदी उत्तम होणार अशी ज्याची त्याची खात्री असे. असा कांही समारंभ असला की समारंभाची यादी करण्यांत येई. माझ्यासारखा लहान मुलगा हातांत कागद घेऊन सामानाची यादी लिहावयास बसे. मग काशीताई इतर बायकांना विचारीत, "साधारण किती पान होईल ?" त्या बायका तरुण, अननुभवी असल्या तरी पानांचा आंकडा अगदी मोजल्यासारखा सांगत. मग त्यावर काशीताई म्हणत, "अग, पांचपंचवीस लोक जास्त येणार हें धरून चालावं. अन्न उरलं तरी चिंता नाही; परंतु अपुरं पडण्यासारखी फजिती नाही." मग पानांचा आंकडा कळला, की यादी सांगण्यास सुरवात होई. अमुक भार केशर, अमुक शेर खवा इत्यादि. यादी सांगतांना इतक्या बिनचूक व सराईत दृष्टीने सांगत, की पाहणाऱ्याला क्षणभर वाटावें, की अनेक कायदेकानू वाचलेला एखादा कायदेपंडित एखाद्या गुन्ह्यावर कलमांच्या आंकड्यांसहित निकालच देत आहे.

यादी सांगून झाली की पुढची तयारीसुद्धा अगदी ठरलेली असे. त्यांचे सर्व लोक अगदी बांधलेले असत. अप्पा बळवंताच्या चौकांतला बाळा वाणी आणि आमच्या मागच्या बाजूस राहणारा बाबू वाजंत्री. आचाऱ्याचें नांव निघालें की त्या म्हणत, "इतर सटरफटर बावळटांना नि गांजेकसांना नका बोलावूं. आपल्या प्रल्हाद आचाऱ्याला बोलवा." माणसांप्रमाणे जिनसांचेंहि होतें. पाट लागले की त्या एखाद्याचें नांव घेऊन म्हणत, "त्यांच्याकडे मिळतील पाट. जा त्यांना जाऊन सांगा, काशीताईंनी पाट मागितले आहेत म्हणून." मोठीं भांडीं, पराती लागल्या की त्यांनी ठरलेल्या माणसांकडे लोक पिटाळलेच म्हणून समजावें. आणि असें झालें की इतर लोकांची मोठीच दगदग वांचे व काशीताईंचा पुण्यप्रद हात लागल्याबरोबर कोणत्याहि कार्याला तेज चढे.

आचारी व वाजंत्रीं या लोकांप्रमाणेच त्यांचे अनेक लोक ठरलेले असत. त्यांच्या उभ्या सत्तर वर्षांच्या अमदानींत फक्त तीन मोलकरिणी झाल्या. अगदी पहिली कोण, तिचें नांव मला आठवत नाही. दुसरी रखमा, आणि

तिसरी सखू. मोलकरणींना वागविण्याची त्यांची तऱ्हा फार चांगली असे. मोलकरीण म्हणून तिला कमी असें कांहीच नसायचें. सकाळीं ती घरीं कामाला आली की तिचें स्वागत गरम चहाने व्हायचे. जेवायला घालायची बोली नसली तरी महिन्यांतून बरेच दिवस त्या तिला मुलांच्या बरोबरीने जेवायला बसवायच्या. मोलकरणीच्या महिन्यांतील चार दिवसांच्या हक्काच्या रजेचे पैसे कापून घेण्याचा क्षुद्र व्यवहारीपणा त्यांनी कधी दाखविला नाही. सारा व्यवहार हसतखिदळत, मित्रभावाचा व्हायचा. मोलकरीण आजारी पडली तर स्वतःच्या हाताने मऊ भात शिजवून तो तिच्या घरीं स्वतः घेऊन जाणाऱ्या काशीताई मोलकरणींना मोठ्या प्रिय असत. त्यांची रखमा मोलकरीण पुढे पाटीवालीचा धंदा करूं लागली. मंडईतल्या एका गाळयांत उत्तम पिवळे जर्द पेरू ती विकीत असे. मी केव्हाहि मंडईंत गेलों, की ती उच्च स्वरांत मला हाका मारी आणि मी जवळ गेल्यानंतर शंकराची पूजा करण्याकरिता बिल्वपत्रें काढावींत त्याप्रमाणे दोनचार टप्पोरे पेरू ती माझ्या हातांत देई आणि म्हणे, "हे दोन पेरू काशीताईला दे. त्यांना म्हणावं, रखमा खुशाल आहे." पांढरपेशाच्या अभिमानाने जर मी त्या दोन पेरूंचे पैसे द्यायला लागलों, तर ती कांही तरी विपरीत ऐकल्यासारखें करून म्हणे, "आता काय करूं बया! तुमच्याकडून पैसे घेतले तर माझे हात झिजून जातील."

त्यांनी सखू मोलकरीण नोकरीला ठेवली ती अगदी अलीकडली वीस-पंचवीस वर्षांतली गोष्ट. सखू वाड्यांत साफसफाईचें काम करी आणि बिऱ्हाडकरूंच्या इतर मोलकरणींनी कुठे घाण टाकली, अव्यवस्थितपणा केला की त्यांना सटकावी. इतर मोलकरणींवर हुकमत चालविणारी म्हणून आम्ही सर्व तिला 'गव्हर्नर' म्हणत असूं. अर्थात् सेक्रेटरी ऑफ स्टेटची गादी काशी-ताईंच्याकडे असे हें सांगायला नकोच.

त्यांच्या कुटुंबाच्या चांगल्या चारदोन पिढ्या तरी वऱ्हाडांत गेल्या होत्या. त्यामुळे वऱ्हाडी लोकांच्या स्वभावांतील उदारपणा आणि अरेरावीपणा यांचें उमरावी मिश्रण त्यांच्या स्वभावांत हटकून सापडे. जोंपर्यंत मर्जी आहे तों-पर्यंत प्रेमाचा आणि आपलेपणाचा मारा करतील; परंतु तोडायची वेळ आली तर जबरदस्त तडाखा दिल्याशिवाय त्या राहायच्या नाहीत अशी त्यांची रीत असे.

त्यांच्या स्वभावांतील प्रेमळपणा आणि कडकपणा दाखविणारा एक प्रसंग मला आठवतो.

त्यांची पूर्वी मावळांत कांही सावकारी होती. 'यमा' नांवाचा कोणी शेतकरी होता, त्याने त्यांचे पैसे परत केले नव्हते. तो यमा माझ्या लहानपणापासून आमच्या वाड्यांत यायचा. मावळ प्रांतांतला माणूस म्हटला की शिवाजीची आठवण होऊन गहिंवरून येण्याचें तें बालिश वय होतें. त्यामुळे यमाबद्दल मला एक चमत्कारिक प्रेम वाटे. तो आला की दर वेळीं माझ्या शिक्षणाबद्दल आस्थेने चौकशी करायचा. अगदी लहानपणापासून 'मग आता वकील केव्हा होणार ?' हा त्याचा प्रश्न ठरलेला असे. मीं कांहीहि उत्तर दिलें, की तो आजूबाजूच्या लोकांकडे पाहत म्हणे, 'बामण ते बामण! त्यांची हुशारी कधी लोपणार आहे!' माझ्या हुशारीची तारीफ करणारा असा एकच मनुष्य आतापर्यंत मला भेटला आहे आणि तो म्हणजे 'यमा'. त्यामुळे यमाबद्दल आम्हां सर्व मुलांना फार प्रेम वाटे.

पण यमा दारांत उभा राहिला, की काशीताईच्या तोंडाचा पट्टा जोरांत सुरू होई. शिव्यांचा आणि अपशब्दांचा गोळीबार फार मोठा होई. "तुझ्यासारख्या पैसेबुडव्याचं तोंड बघेल त्याच्या बेचाळीस पिढ्या नरकांत जातील" असा तोंडचा हिशेब पटकन् होई. यमा स्थितप्रज्ञासारखा उभा असे. कांही न बोलतां आंत सोप्यावर पडशी टाकी. शिव्यांची जणू काय त्याला दखलगिरी नसे. आम्हांला वाटे, की यमाला बहुतेक हात धरून त्या घालविणार; परंतु तसें कांही होत नसे. जेवणाच्या वेळीं त्याचे पान बाहेर मांडलें जाई. चहाच्या वेळीं त्याची आठवण त्या सहसा विसरत नसत. यमा पांचसात दिवस राही, सपाटून शिव्या व पाहुणचार खाई व 'पैशाचं पुढं बघूं' अशी थाप मारून पसार होई! ते पैसे कधी यायचे नाहीत आणि यमाच्या शिव्या कधी चुकायच्या नाहीत! आम्ही त्यांना म्हणायचें, "तुम्हीं त्याला पैसे तर दिलेतच; पण चहा देऊन आणि जेवायला घालून त्याचं इतकं कोडकौतुक कशाला करतां?" त्यावर त्या म्हणत, "खाऊं दे त्याला. काय खाऊन खाऊन माझीं म्हातारीचीं हाडं थोडींच खाणार आहे तो! आलेल्या माणसाला जेवायला घालायचं नाही ही कुठली रीत?"

त्यांना जीवनाबद्दल भयंकर आसक्ति व प्रेम होतें. कमालीची हौस त्यांच्या

प्रत्येक वागण्यांत दिसून येई. आंब्याचें लोणचें करण्याचे दिवस आले की उत्तम कैऱ्या घेण्यापासून तों लोणच्याच्या ताज्या फोडी बिऱ्हाडांतल्या बायकांकडे पाठवून त्यांच्या तोंडची स्तुति ऐकण्यापर्यंत त्यांचा चोखंदळपणा असे. पापड करायचे असले, तर आदल्या दिवशीं पीठ भिजविण्यापासून तों ते ओले पापड पऱ्यावर सोवळ्याने वाळत पडेपर्यंत त्यांना काळजी असे. जी गोष्ट पापडांची तीच हलव्याची. संक्रांतीचे दिवस जवळ आले की संध्याकाळीं हलवा करण्याचा कार्यक्रम ठरलेला असे. परात स्वच्छ घासलेली चकचकीत असे, साखरेचा पाक चांदीच्या स्वच्छ भांड्यांत ठेवलेला असे आणि हातीं धरण्याकरिता ठेवलेलीं फडकीं फाटक्या धोतराचींच असलीं तरी पण अगदी स्फटिकशुभ्र असत. हलव्याचे दाणे परातींतून हालवतांना आवाज होई तो सारखा आसमंतात् चालू राही. हळूहळू हलव्याला काटा येई. दाणे पांढरे-शुभ्र, आकाशांत चमकणाऱ्या ताऱ्यांप्रमाणे तेजस्वी असत. काशीताईंचा हलवा बघितला की इतर तरुण बायकांचा गर्व आणि अभिमान नाहीसा होई आणि त्यांच्या माना विनम्र होत.

जीवनाविषयींची हीच आसक्ति त्यांच्या प्रत्येक वागणुकींत दिसून येई. तशी त्यांची शरीरप्रकृति मूळची निकोप व काटक होतीच, पण तिच्यावर त्यांनी सतत कामाचे आणि अतोनात कष्टांचे संस्कार ठेवल्यामुळे ती जास्तच चांगली झाली होती. परंतु शेवटीं शेवटीं पांचदहा वर्षें त्यांना दम्याच्या त्रास-दायक विकाराने गाठलें व मग त्यांचें देहावसान होईपर्यंत त्यांची आणि दम्याची एक प्रकारची लढत सुरू असे. सरतेशेवटीं जरी त्या दम्याच्या विकाराने मरण पावल्या तरी तो त्यांचा सन्माननीय पराभव झाला, असेंच कोणींहि म्हटलें असतें. सर्व रात्रभर त्यांना खोकल्याच्या उबळी येत आणि जीव घाबरा होई, तरी कोणाच्याहि मदतीची अपेक्षा न करतां त्या रात्रीच्या काळोखाबरोबर दम्याच्या रोगालाहि धैर्याने तोंड देत. रोगाचा ऐन मारा सुरू असतांना त्यांनी प्रातःकालचें स्नान व स्वतःच्या हातानेच पाकसिद्धि करण्याचा हट्ट कधी सोडला नाही. जेव्हा सोडला तेव्हा यमाच्या दरबारांतून त्यांच्याबद्दलचे अगदी अखेरचे हुकूम सुटले होते व मृत्यूची गाडी येण्याच्या घंटेचे टोले जेव्हा त्यांना सतत ऐकूं येऊं लागले तेव्हाच!

ऑक्टोबर महिन्यांतील ती एक सकाळ होती. आकाश कुंद झालें होतें

व सकाळच्या प्रहरीं, गेल्या आठवड्यापासून हळूहळू बंद पडूं लागलेले काशी-ताईंचें शरीरयंत्र कायमचें बंद पडलें. आम्हीं त्यांना बाहेर काढलें. सरकारी कचेरींत जाणारे एक बिऱ्हाडकरू ऑफिसांत जातांना मुद्दाम कलेक्टराजवळ येऊन नमस्कार करून म्हणाले, "चला ! आता कांही काशीताई दिसायच्या नाहीत ! इतके दिवस आम्ही कुठंहि घराबाहेर गेलों तरी आमच्या बायका-माणसांची व मुलाबाळांची काळजी वाटत नसे. काशीताईंच्या आधारावर आम्ही हवे तसे बाहेर भटकत होतों." आणि त्यांना पोंचवून आल्यानंतर "आता पुन्हा कांही काशीताई दिसायच्या नाहीत" हे शब्द ऐकून फार आश्चर्य वाटे. पुनर्जन्मावर माझा विश्वास नाही, तसेंच आत्म्याच्या अमरत्वा-बद्दलचे विचारहि मला विशेष पटत नाहीत. पण माझ्या अल्प बुद्धीला नेहमी असा प्रश्न पडतो, की माणूस जो जगांत राहतो, हें माझें, हें दुसऱ्याचें अशा भावना धरतो, कोणत्या तरी गोष्टीबद्दल निष्ठा बाळगतो– त्या वासनांचें, भावनांचें, निष्ठेचें त्याच्या मरणानंतर काय होतें ? त्या त्या वस्तूवर त्याच्या वासना व भावना जडून राहत नसतील का ? बुद्धिवादी लोक माझ्या अज्ञानाला व भावनावशतेला हसतील; पण अजूनहि जेव्हा मी भल्या पहाटे उठतों आणि एखादे वेळीं काशीताईंच्या खोलींतून खोकल्याची उबळ ऐकूं आल्यासारखा भास मला होतो, तेव्हा काशीताईंच्या वासना व आशा अजूनहि त्या वाड्याभोवती घुटमळत आहेत असें मला वाटतें हें निश्चित.

---

## पांढरपेशांचें जग

: ५ :

परवा मी किसनकडे गेलों होतों. दार लावून जुनीं कागदपत्रें चाळीत होती स्वारी. मी आंत गेलों. थोड्याफार गप्पा झाल्या, आणि नंतर तो कांही कामाकरिता बाहेर गेला. तासाभराने परत येणार होता तो. तो बाहेर जातांच त्याच्या टेबलावरील कागदपत्रांच्या ढिगाऱ्याकडे माझें लक्ष गेलें.

किसनला आलेलीं तीं सर्व पत्रें मीं वाचलीं— अगदी तन्मयतेने अभ्यासलीं. तुम्ही म्हणाल– एका सामान्य माणसाला दुसऱ्या अगदी तसल्याच सामान्य माणसांकडून आलेल्या पत्रांची अशी काय किंमत आहे, की मीं त्यांत अगदी तन्मय व्हावें ! तुमचें म्हणणें दोन कारणांनी खोटें आहे. एक म्हणजे जगांत अगदी सामान्य अशी कोणतीच व्यक्ति नसते; अन् दुसरें म्हणजे ती व्यक्ति जरी कदाचित् सामान्य असली तरी ती ज्या समाजांत राहत असते, वावरत असते, त्या समाजाची ती प्रातिनिधि असते. दवबिंदूंत आकाशाचें प्रतिबिंब दिसावें तद्वतच प्रत्येक व्यक्तींत त्या समाजाचें प्रतिबिंब दिसतें. आणि याच दृष्टीने त्या पत्रव्यवहाराचें महत्त्व मला वाटलें. तुम्हांलाहि तें तसेंच वाटेल. तुम्ही-आम्ही ज्या पांढरपेशा समाजांत राहतों, त्या दरिद्री पांढरपेशा समाजाचें चित्रण तुम्हांला त्यांत आढळून येईल.

श्रीसमर्थ प्रसन्न

पुणें, ता. ×××

अनेक आशीर्वाद विनंती विशेष.

आपणाकडून बरेच दिवसांत पत्र नाही. गेल्या महिन्यांत दोनतीन दिवस

येऊन गेलांत, त्यानंतर मला वाटतें— तुम्ही घराला, पुण्याला आणि भावंडांना पार विसरल्याचें दिसतें. अजून पोरवय आहे म्हणून मी बोलत नाहीं; पण हें बरें नाही. नोकरी लागून तुम्ही बाहेरगावीं गेल्याला आज सहा-सात महिने झाले. एवढ्या अवधींत इतक्या तुटकपणाचें वर्तन तुमच्याकडून व्हावें याचेंच मला आश्चर्य वाटतें! तुमचे तिकडे दिवस हौसेमौजेचे चालले असतील. कांही हरकत नाही. पण हसतांना, चैन करतांना, तुमच्या वृद्ध वडिलांची थोडीफार आठवण ठेवावी, एवढीच माझी मागणी आहे.

पुण्याला तुम्ही आलां असतांना आपलें पैशांबाबत बोलणें झालें. पण त्याचा परिणाम झाल्याचें कांही दिसत नाही. इतरांच्या मुलांविषयी बोलूं नये; पण राहवत नाही म्हणून बोलतों. एकेकाचीं मुलें बघितलीं की खरोखर आश्चर्य वाटतें आणि त्या भाग्याचा हेवा वाटायला लागतो. आपल्या नारायणराव आपट्यांचा मुलगा मुंबईला अडीचशे रुपये मिळवितो. पण अजून घरीं शंभर रुपये पाठवितो आणि बाकीच्या पैशांचा पैन् पै हिशेब घरीं वडिलांना कळवितो. तात्यासाहेब दामल्यांचा नानाहि तसाच. मनमाड-जवळ शुगर फॅक्टरींत आहे नोकरीला; पण खर्चापुरते थोडे पैसे ठेवून बाकीचा सर्व पगार घरीं देतो पाठवून. असें एकेकाचें भाग्य बघितलें आणि माझी स्थिति लक्षांत आणली की माझी मलाच कीव येते.

तूं म्हणशील— 'मला काय सारे पस्तीस रुपये मिळतात! मी असे किती पैसे पाठवणार?' पस्तीस रुपयांतून तुला एकट्या माणसाला असा किती खर्च येणार आहे? जेवणखाणाला पैसे लागत नाहीत; पण तुम्हां मुलांच्या त्या सिगारेट्स्, ते चोळणे अन् ते सत्राशेसाठ कोट यांना पैसा खर्च होतो. माझे वडील कोकणांतून आले तेव्हा त्यांना बारा रुपये पगार होता; त्यांतले सहा रुपये ते घरीं कोकणांत प्रपंचखर्चाला पाठवीत.

मला पैसा कमी मिळतो म्हणून रडत बसण्यांत काय अर्थ आहे? बारा रुपयांवर नोकरीला लागून बाराशेवर रिटायर होणारे लोक थोडे का आहेत? पण त्याला कष्ट केले पाहिजेत. शिकवण्या धर. शाळेची नोकरी संभाळून शिकवण्या करणें कठीण का आहे? पण त्याला तुमचीं तत्त्वें आड येतात! म्हणे दुसऱ्याच्या घरीं शिकवणीला जाणें अपमानास्पद! अपमानास्पद कांही

नाही. फक्त गरीब राहणें हें वाईट आहे. तेव्हा तूं मला महिना पंधरावीस रुपयांची तरी मदत करावीस. तेवढाच माझा भार हलका होईल.

बाकी सर्व क्षेम आहे. चि. सौ. माई परवाच माहेरपणाला आली. मंगळागौरीचें तिचें हें पांचवें वर्ष आहे. मुलांच्या प्रकृति आणि अभ्यास ठीक आहेत. कळावें.

आपला
**बापू**

कल्याण, ता. ×××

नमस्ते !

अलीकडे लोकांना मुळीच पत्रं लिहायचीं नाहीत असं का ठरवलं आहेस ? गेल्या वर्षीं कल्याण स्टेशनवर तुझी अगदी सहज गाठ पडली होती, तेव्हा दोन महिन्यांत निदान एक तरी पत्र लिहिण्याचं तूं आश्वासन दिलं होतंस. त्यानंतर पुन्हा पत्ता नाही !

पण खरं सांगूं ? तुझं पत्र आलं नाही म्हणून मला तरी बिलकुल आश्चर्य वाटत नाही. खरंच, कित्येक वेळां पत्र लिहावं लिहावं असं वाटतं, पण पत्र लिहायला बसलं म्हणजे काय लिहावं हेंच सुचत नाही ! काय घडतं आपल्या दररोजच्या जीवनांत असं विशेष की तें मुद्दाम पत्र लिहून दुसऱ्याला कळविण्याची इच्छा व्हावी ? गडकऱ्यांनी कुठं तरी मानवी आयुष्याचं सार एका वाक्यांत काढलं आहे. तें म्हणजे– जन्मला, जिवंत राहिला आणि मेला ! असल्या आयुष्यांत पत्रं तरी काय लिहायचीं ?

गेल्या वर्षीं मला तूं कल्याण स्टेशनवर भेटलास तेव्हा म्हणाला होतास की मी आता लवकरच 'मुंबईकर' होईन. पण चुकीची कल्पना आहे तुझी.

मी इथं मास्तर म्हणून आलों तेव्हा मला कल्पना नव्हती. बहुतेक सनातनी गावांत नवीन मास्तरला जो जो त्रास होतो तो तो इथं हजर आहे. गेल्या वर्षी इथं एक नवीन मास्तर आले होते. पोरसवदाच होते जरा. चोळणा घालून बोडक्यानं वर्गात जायचे. गावांतल्या लोकांनी इतका कल्लोळ केला की ज्याचं नांव तें !

माझ्या वर्णनानं गांगरून जाऊं नकोस. मी इथं अगदी आनंदांत आहें. संध्याकाळीं खाडीच्या पुलावर किंवा भुईडोंगरी किल्ल्यावर जाऊन बसलं की काय मजा दिसते! आपल्या पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेज टेकडीची आठवण होते. पण फर्ग्युसन टेकडीवरून पाणी दिसत नाही आणि इथं तर खाडी अगदी डोंगराच्या पायथ्याला आहे. तिथली शोभा बघितली की क्षणभर तरी सर्व दुःखांचा विसर पडतो.

तूं माझ्याकडे केव्हा येणार? 'येऊं केव्हा तरी' असं म्हणून चालायचं नाही. मी मास्तर आहें हें लक्षांत ठेव. अलीकडे शिक्षक एकाच गावीं जन्मभर राहूं शकेल असं नाही. गेल्या वर्षी कोकणांत तर यंदा साताऱ्यांत अशी सारखी भ्रमंती करावी लागते त्याला! तेव्हा महाराज, इथं लवकर आगमन करावं. इथली खाडी, भुईडोंगरी किल्ला आणि इथला आग्रा रोड तुला खात्रीने आवडेल. बाकी ऑल ओ. के.

तुझा

**त्रिविक्रम.**

*　　*　　*

ता. ××

ती. किसनदादास–

अलीकडे दोनतीन दिवस मला तुझी फार आठवण येते. तुला पत्र लिहावंसं वाटतं. मन विमनस्क असलं, सुन्न वाटायला लागलं, की कुठं तरी जाऊन मनमोकळेपणानं बोलावंसं वाटतं. इथं तर तसं कुणीच नाही. तेव्हा तुलाच लिहितें झालं पत्र.

अलीकडे ती. बाबांनी माझ्या लग्नाचा मुळी ध्यासच घेतला आहे. ठिकठिकाणच्या विवाह-एजंटांना ते भेटतात, कुठलीं तरी स्थळं हेरतात आणि ते सर्व अपरिचित तरुण मला 'बघायला' येतात. आता कालच मला दाखविण्याचा या महिन्यांतील निदान अकरा-बारावा तरी समारंभ पार पडला.

लग्नाबद्दलच्या माझ्या तशा कांहीच कल्पना नाहीत. माहीत आहे तुला सारं. पण हें बघायला येणं, पत्रिका जुळविणं आणि फोटो पाठविणं याची मला खरोखरच किळस– अगदी शिसारी आली आहे.

लग्न न जमण्याचं मुख्य कारण म्हणजे हुंडा. चांगला शिकलेला आणि जरा बऱ्या स्थितींत असलेला मुलगा हुंडा म्हणून कमींत कमी हजार रुपये मागतो! आणायचे कुठून इतके पैसे बाबांसारख्या कारकुनी पेशांतील माणसानं? मला अलीकडे लग्नाची आणि माझ्या आयुष्याचीच भीति वाटायला लागली आहे.

परवाच आमच्या शाळेंत 'विवाहोत्तर प्रेम की प्रेमोत्तर विवाह?' या विषयावर वादविवाद झाला. मीं प्रेमोत्तर विवाहाची तरफदारी केली. आमचे जोशी मास्तर गमतीनं विवाहोत्तर प्रेमाच्या बाजूनं बोलले. वादविवाद झाला, गंमत झाली, हें सारं खरं; पण मीं घरीं परत आल्यानंतर विचार केला, की प्रेमोत्तर विवाह करणं माझ्यासारख्या मुलीला शक्य आहे का? मी ज्या वाड्यांत राहतें त्या वाड्यांत मुलींनी मुलांबरोबर बोलणंहसणं पाप समजलं जातं. नुसतं संध्याकाळीं दरवाजांत उभं राहिलं तरी बोलायला नि कुजबुजायला लागतात आजूबाजूच्या बायका! आता सांग, अशा स्थितींत प्रेमोत्तर विवाह करणं शक्य आहे का?

परवाची लिमयांची तारा आली होती बसायला आमच्याकडे. यंदाच मॅट्रिक झाली ती. तिनं फर्ग्युसन कॉलेजांत नांव घातलं आहे. गोल पातळ, पावडर, नव्या चकचकीत वहाणा, कपाळावर मुद्दाम सोडलेल्या केसांच्या बटा इत्यादि तिचा थाट लिमयांच्या डेक्कन जिमखान्यावरील बंगल्याला साजेसाच आहे.

ती आली आणि मला बघायला येणार हें तिला कळलं मात्र! इतकी टिंगल केली तिनं माझी, की कांही विचारूं नकोस! सारखी व्याख्यान देत होती. म्हणे बघायला येण्याचा प्रकार पशुवृत्तीचा आहे, स्त्रीजातीला अपमानास्पद आणि लांछनास्पद आहे. काय वाटतं या मुलींना? असले विचार आमच्या मनांत येत नाहीत, आम्ही अगदी दुधखुळ्या आहोंत असं का समजतात त्या? त्याचं असं आहे, तिला लग्नाची काळजी नाही. लिमयांजवळ खूप पैसा आहे. तिच्याकरिता सहज ते चारपांच हजार उडवूं शकतील. बरं, जाऊं द्या. आमचं हें असंच चालणार.

तूं तिकडे अगदी मजेंत असशील? गेल्या वर्षीं मीं पाठविलेल्या हलव्याला

उत्तर म्हणून तूं विकत घेऊन हलव्याची पिशवी पाठविली होतीस. यंदा तसं चालणार नाही. अगदी तुझ्या स्वतःच्या घरांत नव्या वहिनींनी केलेला हलवा मिळाला पाहिजे. तो मिळेल असं वाटतं. बापू त्याच खटपटींत आहेत. कळावें.

तुझी मावसबहीण
**शांता**

* * *

वंदे मातरम्

पुणें, ता. ×××

प्रिय मित्र किसन यास—

मी तुरुंगांतून बाहेर येऊन जवळ जवळ दोन महिने झाले. मी तुरुंगांत गेलों तो सर्वच प्रकार अनपेक्षित झाला. एके दिवशीं उठलों तों पोलीस दाराशीं उभे ! त्यांनी झडती-वारंट दाखविलें आणि लगेच झडती घेण्यास सुरवात केली. आक्षिप्त वाङ्मय मजजवळ होतेंच. तें शोधून काढण्यास पोलिसांना विशेष त्रास पडला नाही. कागद सापडले मात्र, लगेच मला गिरफदार करण्यांत आलें. आज सहा महिन्यांनी मी परत पुण्यांत पाऊल टाकीत आहें.

तुरुंगांत मीं कोणकोणतीं दृश्यें बघितलीं याचें कंटाळवाणें वर्णन मी तुझ्या-जवळ करूं इच्छीत नाहीं. एवढी गोष्ट मात्र खरी, की तुरुंगांतून बाहेर पडल्या-नंतर माझ्या दृष्टिकोनांत बराच फरक झाला आहे.

आमच्याबरोबरच कॉंग्रेसच्या सत्याग्रहांत भाग घेतलेले एक मातबर वकील सुटले. 'अ' वर्गांचे कैदी होते ते ! या लोकांना कैदी कां म्हणावें हेंच मला कळत नाही ! घरचें उत्तम अन्न खायला आणि घरचे कपडे पेहरायला मिळतात त्यांना; शिवाय दोन वेळचा चहा-पाव आहे, वर्तमानपत्रांचें वाचन सुरू असतेंच. वैद्यकीय सल्ल्यानुसार दिवसांतून चारपांच सिगारेट्स्हि ओढतां येतात. त्यांच्या त्यागाची मी टवाळी करीत नाहीं. पण कित्येक वेळां असें वाटतें, की उन्हाळ्याच्या सुट्टींत महाबळेश्वरला जावें त्याप्रमाणे मोठ्या धंद्याच्या व्यापांतून थोडी फार मोकळीक करण्याकरिता हे येरवड्याची

वारी करतात! लोक त्यांचें किती कौतुक करतात! ते सुटले तेव्हा तुरुंगाच्या द्वारांत त्यांच्या घरची मोटार आली होती; तींत त्यांचीं मुलें, मुली, नातेवाईक आले होते. तिथेच हारतुऱ्यांचा समारंभ झाला. एखाद्या विजयी वीराला वाजतगाजत न्यावें तसें त्यांनी त्यांना घरीं नेलें!

उलट माझें स्वागत करण्यास कोणीच नव्हतें. मी घरीं आलों तर घरांतील माणसांची कुतरओढ चाललेली मला दिसली. आई आणि लहान भाऊ तर अक्षरशः एकभुक्त आहेत. विश्वास ठेव अगर ठेवूं नकोस, पण या पुण्यांत त्यांना राहायला जागासुद्धा मिळण्याची अगदी मुष्कील झाली! शेवटीं एका कॉंग्रेससेवकाने त्यांना स्वतःच्या वाड्यांत खोली दिली आणि म्हणून त्यांचें थंडीवाऱ्यापासून संरक्षण होऊं शकलें. हें सर्व लिहायचें कारण इतकेंच, की हल्ली देशभक्तीसुद्धा श्रीमंत लोकांची जिम्मेदारी होऊन बसली आहे. आम्हां दरिद्री पांढरपेशांनी या वादांत पडावें किंवा काय, हा मलाच मोठा प्रश्न आहे.

घरच्या दारिद्र्यामुळे मी खचून गेलों आहें असें मुळीच समजूं नकोस. मी आता धंदेवाला बनलों आहे. कसला धंदा म्हणशील तर लॉंड्रीचा आणि भाजीचा. घरोघरीं भाजीचे रतीब घालतों आणि एका मित्राच्या साहाय्याने लॉंड्री चालवितों. हल्ली दुसऱ्या कोणत्याच गोष्टीला वेळ होत नाही. एकच गोष्ट म्हणजे 'लॉंड्री' माझ्या डोळ्यांपुढे असते. या धंद्यांत गंमत नाही असें समजूं नकोस बरें का. दुसऱ्याच्या घरीं जाऊन कपडे आणणें म्हणजेसुद्धा जगाचा अभ्यास करणें होय. मीं विद्यार्थी म्हणून जग पाहिलें, कांही दिवस कार्यकर्ता म्हणून जगांत हिंडलों, आता श्रमजीवी दलितवर्गाचा एक घटक म्हणून जग बघतों आहे.

तुझें कसें काय चाललें आहे! शाळेंतल्या मुलांना मार्क्सवादाचे धडे देतोस किंवा नाही? गावांत आर्. एस्. एस्. ची संघटना कशी आणि कितपत आहे?

पुण्याला केव्हा आलास म्हणजे एकदा मला जरूर भेट. लोभ आहेच, तेव्हां नुसतेंच कळावें.

आपला
**दिनकर**

* * *

डेक्कन जिमखाना कॉलनी,
लिमये लॉज, पुणें, ता. ×××

किसनदादास—

फोनोग्राफवरचीं माझीं दोन भावगीतें तूं ऐकलींस आणि मला लगेच अभिनंदनाचें पत्र लिहिलेंस. खरेंच, किती आभार मानूं मी तुझे! तीं भावगीतें मात्र मीं केलीं नाहीत बरें का! आमच्या शेजारच्या बंगल्यांतील कॉंट्रॅक्टर गोखल्यांचा वसंता आहे ना, तो आमच्याच कॉलेजमध्ये आहे. त्याने तीं केलीं नि मीं म्हटलीं. सर्व कॉलेजांत एकच दंगल उडाली. मी किंवा वसंत कुठेहि कॉलेजांत हिंडत असलों की मुलें तर त्या कविता मोठमोठ्यांदा म्हणायला लागतात! नाही नाही ते तर्क काढतात! आमच्याच वर्गातलीं हीं मुलं आणि मुली. शांता भावे परवाच लेडीज् रूममध्ये भेटली होती. आम्ही सगळया जमलों होतों. शांता स्वतःला लेखिका आणि कवयित्री समजते. ती म्हणाली या भावगीतांचा अर्थ काय आहे तें माहीत आहे का ग?"

सगळ्या मुलींनी माझ्याकडे बघून डोळे मिचकावले आणि नंतर म्हणाल्या, "काय अर्थ आहे? ऐकूं द्या तरी!"

"अग, असं आहे. अगोदर डोळ्यांनी एकमेकांच्या मनांतील 'भाव' ओळखले, नंतर त्यांतून विवाहाचं सुरेल 'गीत' बाहेर पडेल, आणि मग एका व्यक्तीच्या आयुष्यांत 'वसंत' अवतरेल."

सगळ्या मुली खो-खो हसल्या खट्याळपणाने. जोगळेकरांची कुसुम तर मिस्किलपणें गाऊं लागली. "सुखकर 'वसंत' सरसावला, 'तारिका' करी गायनाला."

आता काय करावें या मुलींना! तूंसुद्धा यांतून कांही भलता अर्थ काढूं नकोस.

माझें कॉलेज-आयुष्य अगदी गमतींत चाललें आहे. संगीत-समितींत तर मी आहेंच, वादविवाद-सभेंतसुद्धा मी बोलतें थोडी फार. तुमच्या त्या गावांत आमचें फर्ग्युसन कॉलेजचें त्रैमासिक येत नसावें. येत असतें तर त्यांत तुला माझी 'प्रेमसाफल्य' ही कविता वाचायला मिळाली असती. चंद्राचें आणि

पृथ्वीचें लग्न लागत आहे, मध्ये रुपेरी चांदण्याचा अंतरपट आहे आणि आकाशांत जमलेल्या सगळ्या चांदण्या वधूची चेष्टामस्करी करीत आहेत, अशी कल्पना आहे त्या कवितेंत. सगळ्यांना ती कविता फार आवडली. बाबांनी तर मासिक दिवाणखान्यांत टेबलावरच ठेवून दिलें आहे. ज्याला त्याला दाखवतात ते ती कविता.

परवा तुझ्या शांताकडे गेलें होतें. मोठी आजीबाई झाली आहे ती. सारी पांचवी-सहावींतली मुलगी; पण सारा वेळ अगदी तोंड आवळून गप्प बसलेली असते. कसें यांना असें तोंड आवळून एखाद्या म्हातारड्यासारखें बसावेंसें वाटतें कुणाला ठाऊक!

हो खरेंच, आता ती मोठी 'बाई' होणार आहे. लग्न जमवीत आहेत ना तिचे! मी गेलें त्या दिवशीं तिला कुणी तरी बघायला येणार होतें. मुलगा आहे कोणत्या तरी शाळेंत चाळीस रुपयांवर मास्तर. कशा या मुली या जुनाट वधूपरीक्षेच्या पद्धतीला मान तुकवितात कोणास ठाऊक! मुलींना म्हणे 'बघायला' येणार! एवढे कोण टिकोजी लागून राहिले आहेत हे! मी असतें तिच्या जागीं तर अश्शी केस सोडून अन् मळवट भरून त्या मास्तर-पुढे उभी राहिलें असतें, असा भेदरून टाकला असता त्याला, की पुन्हा त्याने नांव नसतें काढलें! त्याला तरी कळलें असतें, आम्ही मुली म्हणजे कांही मंडईतला भाजीपाला नव्हे!

बाकी कांही नाही. तुझी परवाची गोष्ट वाचली. खांडेकरी वाङ्मयाने पछाडलेलें दिसतें आहे तुला. गरिबांचें जग, श्रमजीवी दलित वर्ग इत्यादि बरेच शब्द त्यांत होते. खरें सांगायचें म्हणजे मला कांही त्यांतलें विशेष कळत नाही. तेव्हा म्हणतें झालें, की प्रयत्न स्तुत्य आहे.

पुण्याला केव्हा येणार? आलास म्हणजे आमच्याकडे एकदा येऊन जायला विसरूं नकोस. चालत यायला कंटाळा येतो ही सबब मी ऐकणार नाहीं. पुण्यांत बस आहे आता. सेवासदन चौकांत बसलास की पांच मिनिटांत अगदी आमच्या बंगल्यासमोर उतरशील. कळावें.

तुझी आतेबहीण,
तारा

* * *

हिंदु कॉलनी, दादर, ता. ×××

नमस्ते किसनराव !

माझी लग्नचिठ्ठी बघून तूं मला अभिनंदनाचें पत्र पाठविलेंस आणि वर खवचटपणानें विचारलेंस की मागील प्रेमभंगाच्या जखमा मी पार विसरून गेलों किंवा काय ? पुण्यांतल्या प्रेमाची माझी आठवण पार बुजून गेली किंवा कसें ? हेंच पत्र जर वर्षा दीड वर्षापूर्वीं आलें असतें, तर मीं तुला प्रेमाच्या अमरत्वाबद्दल एकादें जंगी व्याख्यान ऐकवलें असतें. कदाचित्– कांही नेम नाही त्याचा– एखादी शोकपर्यवसायी कविताहि तुला गाऊन– किंचाळून नव्हे— दाखविली असती.

परंतु आता तसें करणें महामूर्खपणाचें वाटतें. त्या वेळीं मी मूर्ख होतों, जगांतील व्यवहार मला अल्पांशानेहि कळत नव्हते असें आता मला प्रामाणिकपणानें वाटतें. जर ते तसे कळते, तर मीं आमच्या शेजारच्या परांजपे वकिलांच्या सुशीलेचा इतका ध्यास घेतला नसता, वेड्यासारख्या त्यांच्या घरावरून फेऱ्या घातल्या नसत्या. पोरवयांतील कल्पना त्या ! वाटे– काय झालें सुशीलेवर प्रेम करायला ? पण आता पटतें सारें. अरे, कुठे परांजपे वकील आणि कुठे आपण सारी मंडळी ! तिचें माझ्याशीं लग्न कसें होणार ? आणि जर यदाकदाचित् झालें तर नेहमी मोटारींतून हिंडणाऱ्या त्या मुलीनें, माझ्यासारख्या दरिद्री माणसाच्या घरीं स्वयंपाकपाणी करीत दिवस घालवायचे तरी कसे ? पण तारुण्यांत सगळेंच साध्य वाटतें. तो तारुण्याचा दोष आहे, आपला खास नाही. तुला आठवतें किसन, सुशीलेचें लग्न झालें त्या दिवशीं रात्रीं तिची वरात बघायला म्हणून मुद्दाम आपण बुधवारांतून भटकलों आणि नंतर एखाद्या लहान मुलासारखा मी ओक्साबोक्शीं रडलों ! आता तो प्रकार आठवला की हसूं येतें. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच, की माझ्या प्रेमभंगाच्या जखमा आता पार बऱ्या झाल्या आहेत. माझ्या पत्नीबरोबर मी अगदी उत्तम रीतीनें, खरोखर मन लावून संसार करतों. आम्ही पूर्ण आनंदांत आहोंत.

बाकी हा सर्व आनंद बाहेरचा– अंतर्यामीचा खास नाही. भयंकर ओढाताणींत कसा तरी संसार हाकायचा आणि बाह्यतः आनंदी मुद्रा ठेवायची इतकेंच ! मला सारे पन्नास रुपये मिळतात. त्यांतून ब्लॉकचें भाडें जातें दरमहा एकवीस रुपये. नंतर चार रुपये रेल्वे पास. राहिलेल्या पंचवीसतीस

रुपयांत आम्ही दोघें राजाराणी— कोणत्या गावचीं कुणास ठाऊक !— अगदी टेकीने संसार चालवीत आहोंत.

असला दरिद्री संसार बघितला की स्वतःचीच स्वतःला लाज वाटते बघ ! सकाळीं उठल्यापासून रात्रीं निजेपर्यंत जीवनांतल्या अगदी आवश्यक गरजा भागविण्याकरिता सारखी धडपड करावी लागते. मी सकाळीं नऊ वाजतां जेवून घराबाहेर पडतों तों संध्याकाळीं सात वाजतां घरीं परत येतों. तोसुद्धा इतका दमून आणि पिळवटून, की कांही नकोसें वाटतें. मुंबईच्या आयुष्याची सवय झाली आहे आता. तरी सुद्धा त्या गजबजाटाचा अन् धांदलीच्या जीवनाचा कंटाळा येतो कधी कधी. सकाळीं चार वाजल्यापासून सारखी धांदल सुरू असते लोकांची. फूटपाथवरून, ट्रॅममधून, लोकलमधून लोक सारखे आपल्या रक्ताच्या आहुत्या मुंबादेवीला अर्पण करण्यास जात असतात. एखादे वेळीं सकाळीं मी गॅलरींत उभा राहतों आणि खालील नाना तऱ्हेचे, नाना जातींचे लोक किल्ली दिलेल्या बाहुल्यांप्रमाणे इकडे तिकडे जातांना बघितलें की वाटतें, जीवनाचा ह्याच हेतु असावा काय ? कोणत्याहि शारीरिक अगर मानसिक सुखाची अपेक्षा न करतां एकसारखें काम करण्याकरिता का आपण जन्माला येतों ?

असले वेदांती विचार संध्याकाळीं ऑफिसमधून परत येतांना फार येतात. एखादे वेळीं मी गमतीने गिरगावांतून ट्रॅमने येतों. ट्रॅमच्या दुसऱ्या मजल्यावर खिडकींत बसलें की जगाचें अफाट स्वरूप दृष्टीस पडतें.

ते गिरगांवांतले दरिद्री पांढरपेशे लोक आणि त्यांच्या बायका, तो फोरास रोड, तीं पानपट्टीचीं दुकानें, त्यांत बसलेले खोल डोळ्यांचे नि फाटक्या अंगाचे भकास लोक, त्या लोकांशीं सलगीच्या नात्याने बोलणाऱ्या त्या पान-तंबाखू चघळणाऱ्या वारयोषिता, त्या खिडकींत उभ्या राहून गिऱ्हाइकांची वाट बघणाऱ्या स्त्रिया, ते लालबाग-परळचे मजूर अन् पुन्हा ते दादरचे पांढरपेशे लोक— इतके सगळे लोक मी बघतों अन् त्यांच्या धडपडीची कीव करतों. आपलें आयुष्य झपाट्याने निघून जातें. त्याच्याकडे बघायला, त्याची गोडी गमतीने चाखायला आपणाला वेळ मिळत नाही हेंच खरें.

असो. खूपच लांबलें पत्र. गंमतीने पत्र लिहायला बसलों आणि निराळेंच लिहून गेलों. तेव्हा इथेच संपवितों पत्र. गुडबाय् !

तुझा

**नाना**

## उपेक्षिताचें अंतरंग : ६ :

तसें पाहिलें तर कॉलेजच्या आयुष्याचीं स्वप्नें मला सहावी पास झाल्यापासूनच पडायला लागलीं होतीं. सातवींत आल्यानंतर मी इतरांकडे थोड्या कमीपणाच्या भावनेने पाहूं लागलों आणि मास्तरांबरोबर बरोबरीच्या नात्याने वागायचाहि यत्न करूं लागलों. त्या वर्षीच्या गॅदरिंगमध्ये मीं नायकाचें काम केल्यामुळे व तें काम कल्पनेबाहेर यशस्वी झाल्याने मी त्या वर्षीचा शाळेचा 'हीरो' बनलों होतों. शाळेंतल्या सहावी-सातवींतल्या मुली माझ्याशीं मुद्दाम ओळख करून घेऊं लागल्या. मुलींशीं खूप बोलावें, त्यांच्याबरोबर हिंडायला जावें, खेळांत भाग घेऊन प्रावीण्य मिळवावें अगर वक्ता म्हणून गाजावें, असें सारखें माझ्या मनांत येई. पण कल्याणसारख्या बारक्या गावांत आणि सातआठशे मुलांच्या शाळेंत पुढे तरी किती येणार ?

आणि म्हणूनच जेव्हा मॅट्रिकचा निकाल लागला आणि माझ्या विजयाचीं निशाणें जिकडे तिकडे फडकलीं, तेव्हा मला स्वर्ग दोन बोटें उरला होता. कडकडीत इस्त्रीच्या सुटांत, स्वच्छ दाढी करून आणि हातांत ऐटीने एक सरकवही घेऊन जेव्हा मुंबईला कॉलेजमध्ये जाण्यासाठी कल्याणहून पहिल्या दिवशीं लोकल गाठली तेव्हा तें दोन बोटांचें अंतरहि नाहीसें झालें. मीं एका नवीन जगांत प्रवेश केला होता.

पण मुंबईच्या कॉलेज-आयुष्याचा वर्षभरांतच मला वीट आला. सकाळीं उठून झटपट आंघोळ करून जेवण उरकून लोकल गाठायची घाई मला

करावी लागे. संध्याकाळीं लायब्ररींत जाऊन अगर मित्रांकडे चार गप्पा छाटून होतात न होतात तों पुन्हा लोकल पकडण्याची घाई ! सारा दिवस जणू प्रवासांत जाई. कॉलेज-आयुष्याच्या मनमुराद मौजा चाखायला मला सवडच मिळेनाशी झाली. दादरच्या भागांत अगर चौपाटीवर एकदोन मित्रांबरोबर रंगीबेरंगी पातळें पाहत हिंडायला, अगर एखाद्या प्रसिद्ध टेनिस-पटूचा सेट पाहायला, अगर एखाद्या प्रणयपूर्ण सिनेमाला सिगारेट फुंकीत जायला मला सवडच मिळेना. बाबा जरी नव्या वळणाचे आणि सुधारकी मताचे होते, तरी त्यांना माझ्या बाबतींत आपला उदारपणा कधीच दाखवितां येत नसे. सगळ्यांच्याबरोबर सकाळीं साडेसहाला चहा घ्यायला हजर हें राहिलेंच पाहिजे, कॉलेजला जायच्या आंत आंघोळ अगदी नियमाने झाली पाहिजे आणि रात्रीं नवाच्या आंत घरीं आलेंच पाहिजे, इत्यादि त्यांचीं कडक बंधनें मला अलीकडे झेपेनाशीं झालीं होतीं. कॉलेजचें कसलें आयुष्य तें ! मुंबई ते कल्याण लोकलचा प्रवास होता तो !

यांतून कांही तरी करून निसटण्याचा मार्ग मी पाहतच होतों. नागपूरला दिलेली माझी थोरली बहीण माहेरपणाला आली होती. मायेच्या माणसांनी आपल्याला बरेच दिवसांनी पाहिलें, की आपल्या प्रकृतींत कांही तरी भयंकर फरक पडला आहे अशी त्यांची समजूत होते. माझ्या गालाचीं हाडें वर आलीं आहेत, डोळ्यांतील तेज कमी झालें आहे, तोंडावर तकाकी तर अजीबात नाही, असें जें माझें वर्णन माझ्या बहिणीने आल्यादिवशींच केलें तें यामुळेंच.

मुंबई सोडायला उत्सुक असलेला माझ्यासारखा मनुष्य इतक्या चांगल्या संधीचा उपयोग केल्याशिवाय कसा राहील ? मुंबईची हवा प्रकृतीला कशी मानवत नाही, अंगांतून सारखा घामच जातो, सकाळ-संध्याकाळचा लोकल-चा प्रवास फार त्रासदायक होतो इत्यादि गोष्टी सांगून मीं सुचविलें, की असला वैराण आयुष्यक्रम घालवून प्रकृतीची आपल्या हाताने माती करण्या-पेक्षा पुण्याला कॉलेजांत नांव घातलेलें फार बरें.

पण पुण्याला कॉलेजांत दाखल व्हायला बाबांचा विरोध होता. मुलें स्वतः-च्या देखरेखीखाली नसलीं म्हणजे बिघडतात असा त्यांचा समज होता. " शिवाय नसता खर्च ! पुण्याला स्वतंत्र खोली घेऊन राहायचं, खानावळींत

जेवायचं इत्यादि खर्च आणि कॉलेजची फी म्हणजे सहज शंभर रुपये महिना पाठवायला पाहिजेत! सध्याच्या दिवसांत इतके पैसे एका मुलाला पाठवायचे म्हणजे..." बाबा म्हणाले.

इतका वेळ गप्प बसलेली आणि मीं मुंबईला जाऊंच नये अशा मताची असलेली आई एकदम म्हणाली, "एवढं काय पैशाचं? पोराची तब्येत जास्ती की पैसे? आणि पैसे काय कमी आहेत आपणाला? एकुलता एक मुलगा. तें कांही नाही. शरदला जर पुण्याची हवा मानवते तर त्याला तिथंच पाठवायचा. तिथं रा. ब. रानडे आहेतच. मागं एकदा त्यांच्याकडे पंधरा दिवस तो गेला होता तर कसा गुटगुटीत होऊन आला. त्यांची बायको पोरासारखा सांभाळ करील त्याचा. मधून मधून त्यांच्याकडे जात जा रे शरद! त्याच्या बरोबरीचीं मुलंहि आहेत रानड्यांची. कुसुम आहे, कान्त आहे, लिली आहे. चांगला रमून जाईल तो त्यांच्यांत."

* * *

पी. वाय्. सी. कॉलनींतील रानड्यांच्या बंगल्यापुढे जेव्हा माझा टांगा उभा राहिला आणि कुसुम "अग आई, शरद आला" असें सांगायला जेव्हां तरुण मुलीच्या मनोहर लगबगीने आंत गेली, तेव्हा वरील संवाद सहज माझ्या डोक्यांतून गेला. माणसाचें असें बरेच वेळां होतें. मागल्या एखाद्या प्रसंगांतील कांही भाग अगदी अकारण आपल्या डोळ्यांपुढे येऊन जातो.

रानडे म्हणजे पुण्याच्या श्रीमंत घराण्यांपैकी एक होते. काकू वयस्क झाल्या होत्या तरी त्यांच्या चेहऱ्यावरील गर्भश्रीमंतीचें तेज कुणाच्याहि नजरेंत सहज भरण्याजोगें होतें. रानड्यांना मुलें तीनच– लीला, कुसुम आणि चंद्रकांत. लीला आणि चंद्रकांत कॉलेजांत शिकत होतीं. कुसुम यंदा मॅट्रिकला होती. तिन्ही भावंडें दिसायला सुंदर होतीं. कुसुम तर शंभरजणींत उठून दिसे. तारुण्य तिच्या नसानसांतून नुसतें ओसंडत होतें.

रावबहादुरांची आणि माझ्या वडिलांची ओळख अगदी लहानपणापासून. डेक्कनमध्ये बाबा आणि ते एका वर्गांत होते. पुढे बाबा वकील झाले आणि रानडे पी. डब्ल्यू. डी. मध्ये शिरले. दोघांनीहि आपल्या क्षेत्रांत उत्तम नांव कमावलें होतें. रानडे इंग्लिश अमदानीचे कट्टे अभिमानी असत. तसे ते सुधारक होते; पण पुनर्विवाह ही त्यांच्या सुधारणेची कमाल मर्यादा होती.

रानड्यांच्या सुधारणेची गंमत ही होती की, ते बाहेरून जरी सुधारणा दाखवीत तरी अंतर्यामीं पक्के सनातनी होते. ते स्वतः पूजा करीत नसत हें खरें; पण खास पूजेकरिता त्यांनी एक भिक्षुक पदरीं बाळगला होता हेंहि खोटें नाही. सामाजिक बाबतींत स्त्री-पुरुषांनी मिळूनमिसळून वागावें असें तें म्हणत; पण त्यांच्या घरांत सगळा जुना कारभार असे. मुलामुलींनी एकत्र हसलें खिदळलेलें त्यांना पसंत नव्हतें; मग प्रेमविवाहाची गोष्टच बोलायला नको!

पण रावबहादुर अगर अगदी त्यांचाच कित्ता असलेल्या त्यांच्या पत्नी मनाच्या वाईट होत्या असें मात्र खास नव्हे. मुलींनी संध्याकाळीं सातानंतर घराबाहेर राहायचें नाही अगर एखाद्या तरुणाशीं चुकूनसुद्धां बोलायचें नाही ही रावबहादुरीणबाईंची शिस्त होती. पण मंगळागौरी जागवायला अगर वर्गांतल्या एखाद्या ट्रिपला जायला, कुसुम-लीलांना त्यांनी कधी मनाई केली नव्हती. त्यांच्या कांही मैत्रिणी घरीं आल्या तर त्यांची बडदास्त ठेवण्यांत त्यांनी कधीच कुचराई केली नव्हती.

कपडे वगैरे काढून व हातपाय धुऊन चहा घेतल्यावर मीं म्हटलें, "नाना, मी जातों आता खोली बघायला. लवकरच पाहिलेली बरी. नाही तर सगळ्या 'ऑक्युपाय' होऊन जायच्या."

"थांब रे. तुला काय काळजी खोलीची? कॉलनींतल्या चितळ्यांच्या बंगल्यांतील खोली मीं पाहून सांगूनहि ठेवली आहे. उत्तम खोली आहे. पश्चिमेचा वारा आहे. आता जरा 'रेस्ट' घे, थोड्या गप्पा मार, मग दुपारीं जा खोली पाहायला. कालपासून कुसुम तर तूं येणार म्हणून नाचत सुटलीय्. कुसुम नाही तर कान्त कुणी तरी येईल खोली दाखवायला. इथं जवळ तर आहे. हं, मग काय म्हणतीय दादांची तब्येत?"

आणि मग बाबांची तब्येत, थोरल्या बहिणीचें दिवाळींतील वास्तव्य, तिच्या लहान मुलाचें नांव, माझें पुण्याला यायचें कारण– इत्यादि गोष्टी मीं हळूहळू सांगितल्या. कुसुम अगदी लक्ष लावून माझें बोलणें ऐकत होती. मीहि मधून मधून तिच्याकडे पाही. मागे रावबहादुरीणबाई नेहमी म्हणायच्या, "शरद-कुसुमचा जोडा अगदी छान शोभेल, नाही?" माझ्या मनांत आलें, त्यांच्या मनांत अजूनहि ती कल्पना असेल का? कुसुमला माझ्याबद्दल काय वाटत असेल?

रविवार असल्यामुळे सगळ्यांचीं जेवणें एकदम व्हायचीं होतीं. मी आल्यामुळे थोडें गोडधोडहि केलें होतें. आम्हीं सगळींजण जेवत होतों. कुसुम, लीला वाढत होत्या. चंद्रकांतने बटाट्याची भाजी मागितली; पण कुसुमने घाईघाईने ती माझ्याच पानांत वाढली. चंद्रकान्त म्हणाला, " अग, मीं मागितली भाजी." लीला थोडीच ही संधि घालवणार ? प्रेमाचे नाजुक खेळ ती खेळत होती. चितळ्यांच्या मुलाची आणि तिची मैत्री मला माहीत होती. ती म्हणाली, " लक्ष कुठं आहे कुसुमचं वाढण्यांत ? खरंच, कुठं आहे ग तुझं लक्ष कुसुम ? " असें म्हणून एक अर्थपूर्ण नजर तिने माझ्याकडे टाकली.

जेवण रंगांत आलें होतें. एवढ्यांत माजघरांतून एक मुलगा आंत आला. रानड्यांच्या घरांत तो अगदी घरोब्याचा दिसला. काळसर चेहरा, कुरूपांत जमा होणारें रूप, छाती किंचित् आंत गेलेली, पाठींत थोडें कुबड आल्या-सारखें झालेलें आणि डोळ्यांतलें हास्य-उन्माद नाहीसे होऊन तेथे स्थिर अशी निराश छटा आलेली, अशी ही व्यक्ति कोण बुवा ! बरेच दिवसांत स्वारीने दाढी केली नव्हती, हें त्याच्या थोबाडावरून सहज दिसत होतें. माझ्याच वयाचा हा तरुण— पण गाल बसके, डोळे खोल गेलेले, धोतराचा काचा बावळटासारखा मारलेला, कोट मळकटच— असें हें ध्यान सरळ स्वयंपाकघरांत आलें.

जेवतां जेवतां नाना अप्पाशीं देण्याघेण्याबद्दल बोलत होते. अमक्याकडे गेला होतास का, तमक्याने केव्हाचा वायदा केला आहे, इत्यादि त्यांचे प्रश्न आणि अप्पाचीं उत्तरें ऐकून माझी खात्री झाली, की अप्पा हा रानड्यांकडचा एक कारकून आहे. जेवणें झाल्यानंतर रा. ब.ना विड्याला पानें नव्हतीं, तींहि अप्पाने आणून दिलीं.

दुपारीं इकडल्या तिकडल्या गप्पा मारतां मारतां रा. ब. एकदम म्हणाले, " अरे खरंच ! शरद, तूं आणि अप्पा दोघंहि इंटरलाच आहांत. तो बिचारा एका रूमपार्टनरच्या शोधांत आहे. अप्पा म्हणजे आमच्या वडगांवच्या तलाठ्याचा मुलगा. गरीब आहे, पण सालस आहे. आहे रेम्याडोक्याच, पण विश्वासू आहे. तुला तरी स्वतंत्र खोली काय करायची आहे ? खरं म्हणजे तूं इथंच राहा असं मी म्हणणार होतों; पण तुला संकोच नको म्हणून खोली घे असं म्हणतोंय. अप्पा अन् तूं एकत्र राहा झालं, अं ? "

रा. ब. च्या शब्दाला 'नाही' म्हणणें मला शक्य नव्हतें. खरें म्हणजे अप्पाचें तें ध्यान मला खोलींत नको होतें. हसतखेळत चार वर्षें घालवायचीं, टेनिस खेळायचें, स्पोर्ट्समध्ये बक्षिसें मिळवायचीं, कुसुमच्या प्रेमाचे धनी व्हायचें– असा माझा आयुष्यक्रम मी आखीत होतों. त्यांत अप्पाची ही नसती ब्याद ! हीं गरिबाचीं कार्टी शिकतात कशाला कुणास ठाऊक !

पण रा. ब. चें म्हणणें मला ऐकायला पाहिजे होतें. दुपारीं त्यांनी अप्पाला बोलावणें धाडून घरीं आणलें. त्याची नि माझी ओळख करून दिली. रा. ब. म्हणाले, " तुम्ही एकत्र राहिलांत तर बरं ! तेवढीच अप्पाला मदत होईल. आमच्या घरीं सारखं यावं लागतं, तेव्हा याच भागांत अप्पाला खोली मिळाली तर बरं ! तेवढीच त्याला मदत होईल. तुझ्या खानावळीचा दर दहा ना रे अप्पा ? हं. त्याला शिकवण्यांचे पंधरा रुपये मिळतात. चार रुपये देईल तुला तो भाड्याचे. मग काय ठरलं ना ? "

अप्पाची कांहीच हरकत नव्हती. त्याला विशेष आनंद झाल्याचेंहि दिसलें नाही. सकाळीं होता तसाच दमलेला, आंबट चेहरा करून तो बसला होता. तीच निराश आणि स्थिर नजर ! माझी ओळख करून दिल्यावर त्याने मला नमस्कार केल्यासारखें केलें आणि 'ठीक आहे' एवढेंच मला म्हणून तो निघून गेला.

मला नवीन खोली मिळाल्याचा काय आनंद होत होता ! आयुष्यांत प्रथमच मी खोली घेऊन राहणार होतों. नवीन स्वतंत्र खोली ! 'पहिलें मूल', 'पहिलें चुंबन' इत्यादि यादींत 'पहिली घेतलेली खोली' हें सदर गडकऱ्यांनी कां घातलें नाही कुणास ठाऊक ! अप्पाच्या चेहऱ्यावर यांतला कांहीच विकार दिसत नव्हता. खोली नवी काय अगर जुनी काय, सारें जग त्याला सारखेंच असल्याचें दिसत होतें. जगण्याचा म्हणून जो चिवट आनंद असतो तो त्याच्या गावींहि नव्हता.

संध्याकाळचा चहा घेऊन मी व कुसुम माझी नवी खोली पाहायला गेलों. कुसुमने मुलांशीं बोलूं नये म्हणून नेहमी दक्षता बाळगणाऱ्या काकू तिला माझ्याशीं बोलण्यांत मुळीच आडकाठी करीत नसत. किंबहुना तिचें-माझें बोलणें वाढावें अशीच त्यांची इच्छा दिसली. घरांत कामाला गडी असतांनाहि व आल्यागेल्या पै-पाहुण्याला चहा करून देण्याची कामगिरी त्याच्याकडे

असतांनाहि मला चहा करून देण्याचें काम काकूंनी कुसुमकडेच दिलें होतें. आता मला चितळ्यांच्या बंगल्यांतली खोली दाखविण्याचें कामहि तिच्याकडेच होतें. गड्याच्या हातीं लोखंडी कॉट, आरसा, फणी, टेबल, बेडिंग इत्यादि सामान रा. ब. नी खोलीवर नेऊन टाकवलें होतें. चहा पिऊन, केसांवरून एकदा फणी फिरवून व रुमालाने तोंड स्वच्छ करून सुटाबुटांत जेव्हा मी कुसुमबरोबर बाहेर पडलों तेव्हा मी कुठल्या तरी धुंदींत चालल्यासारखा जात होतों. कुठे मुंबईचें आयुष्य आणि कुठे ही पुण्याच्या आयुष्याची चांदरात ! सोळासतरा वर्षांच्या तरुण सुंदर मुलीबरोबर, करकर बूट वाजवीत आणि आसपासच्या जगाकडे विजयी मुद्रेने पाहत चालण्याची जी मौज आहे ती अनुभवाशिवाय कशी कळणार !

खोली पाहून आपण तर खूष झालों. बंगल्याच्या अगदी एका बाजूला असल्याने कुणाची गडबड अगर ये-जा अशी नव्हतीच. खोली बंगल्याच्या दुसऱ्या मजल्यावर होती. पलीकडल्या पी. वाय्. सी. च्या ग्राउंडकडे तोंड करून एक खिडकी होती. बाहेरील रस्त्यावरील ये-जा, खेळाडूंची गडबड, फिरायला येणाऱ्यांची धांदल– सारें कांही या खिडकींतून पाहतां येई. दुसऱ्या बाजूच्या बारक्या खिडकीचें तोंड मात्र पलीकडच्या दोन बंगल्यांच्या मागील दारांकडे होतें.

खोलीचें कुलूप कांही कुसुमला झट्दिशी उघडेना. पाहुण्यादेखत कुलूप उघडतां येत नसल्यामुळे सहज अशा लज्जायुक्त अपमानाने ती गोरीमोरी झाली होती. पण मूळच्या रसरशीत लालपणांत या भावनेची भर पडतांच ती ज़ास्तच आरक्त दिसूं लागली.

झट्दिशी मींच तिच्या हातून किल्ली घेऊन कुलूप उघडलें. एकांतांत झालेला तिचा तो पहिला स्पर्श मी कधीहि विसरणार नाही. याआधी मी पुण्याला रानड्यांकडे पांचदहा वेळां तरी गेलों असेन, कुसुम आणि मी खूप बोलतहि असूं, काकू आम्हां दोघांना चिडवीत असत; पण असा एकान्त मला आजपर्यंत कधीच मिळाला नव्हता !

खोली उघडून आम्ही आंत गेलों आणि जरा वेळाने खोली सजवायची कशी याबद्दल आमची चर्चा सुरू झाली.

" मला वाटतं शरद, तुझी कॉट इकडे ग्राउंडच्या खिडकीकडे टाक.

संध्याकाळीं बाहेर गंमत पाहतां येईल. इकडून सूर्यास्ताचा देखावा फार सुंदर दिसतो."

"अरे वा ! तूं तर कवयित्री व्हायला लागलीस की ! संभाळ हं ! नाही तर मॅट्रिकचा अभ्यास राहील बाजूला अन् बसशील सूर्यास्ताचीं अन् सूर्योदयाचीं वर्णनं लिहीत !"

"बरं-बरं, राहूं दे अभ्यास ! माझा अभ्यास राहिला तर तूं करशील वाटतं माझ्या वाटचा ?" कुसुम माझ्याकडे रोखून पाहत म्हणाली.

"हो, करीन की. तुझ्याकरिता काय वाटेल तें करीन. बरं, खोली कशी लावायची सांग ना ? कॉट या दुसऱ्या बाजूला ठेवली तऽऽर..." मी म्हणालों.

"शीः ! तिकडे काय करायची ? अप्पाची कॉट राहील तिथं."

"बाकी इकडे कांही मनोहर दृश्य नाही. पलीकडच्या बंगल्यांचीं मागील दारंच आहेत इकडे. अन् वाराहि इकडून येत नाही... बाकी पलीकडल्या मुली मागल्या गॅलरींत आल्या म्हणजे पाहायला सापडतील तेवढ्या. मुली आहेत सुंदर."

"अस्सं ! इतकं का सुंदर मुलींकडे पाहत असतोस ? म्हणूनच मघाशी माझ्याकडे पाहत होतास वाटतं ?" ती म्हणाली.

"वेडी रे वेडी ! तुला कुणीं सांगितलं तूं सुंदर आहेस म्हणून ?" मीं अवखळपणाने म्हटलें.

"असं रे काय छळतोस शरद मघापासून ?" डाव्या खांद्यावरचा शेपटा मागे सारीत ती म्हणाली, "अशानं मी जातेंच..."

फणकाऱ्याने ती खोलीच्या दारापर्यंत जाऊन दार उघडणार तोंच तिला अडवीत मीं म्हटलें, "इतका का राग आला ? बरं बुवा ! तूं आहेस सुंदर. अगदी तुझ्या गळ्याशपथ !" आणि त्यावर तिने अशा कांही मोहक नजरेने माझ्याकडे पाहिलं की मला वाटलें, माझी कुसुम मला मिळाली होती. त्या उन्मादक अवस्थेंतच आम्ही खोलीबाहेर पडलों.

रानड्यांच्या बंगल्याचें फाटक उघडून आंत जाणार इतक्यांत तिकडून सायकलच्या हँडलला भाजीची झोळी अडकवून अप्पा येतांना दृष्टीस पडला. त्याच्या सायकल चालविण्यांत तरी कांही रुबाब होता का ? सायकल कशी

चालवायची हें तो जणू शिकलाच नव्हता ! पॅडल मारतांना त्या त्या अंगाला खांद्यापासून साऱ्या शरिराचा भाग वाकवीत आणि हँडलवर सबंध शरीर रेलून तो येत होता. चेनमध्ये धोतर अडकूं नये म्हणून धोतराचा बोळाच जणू त्याने सीटवर जमा केला होता.

"हं, कसं काय ?" सायकलवरून उतरत धापा टाकीत तो म्हणाला आणि उत्तराची फारशी वाट न पाहतां फाटकांतून तो आंतहि गेला. संथपणें त्याने सायकल ठेवली, दोन्ही बाजूंच्या झोळ्या काढल्या, खिशांत ठेवलेलीं केळीं काढून तीं एका झोळींत टाकलीं आणि फाटक्या वहाणा दाराबाहेर ठेवून तो आंत गेला.

"हे आमचे रूम-पार्टनर ! काय जोडीदार शोधून दिला आहे तुझ्या बाबांनी !" मीं कुसुमला म्हटलें.

"उगीच रे कां नांवं ठेवतोस त्याला ? तुला पुष्कळ उपयोगी पडेल अप्पा."

"पण अडचणच होणार ती एक खोलींत ! तूं आल्यावर एकान्तसुद्धा मिळणार नाही आपल्याला."

"असं होय ? मग मी येणारच नाहीं मुळी." कुसुम खट्याळपणाने म्हणाली.

"कां ? पुन्हा मागचं उत्तर देऊं वाटतं ?" मीं उन्मादक दृष्टीने तिच्याकडे पाहत म्हटलें.

पण एवढ्यांत व्हरांड्यांत काकू आल्याची चाहूल लागली आणि आम्ही आंत गेलों.

* * *

खोली घेतल्यानंतर एकदोन दिवसांनी सकाळीं अप्पाची स्वारी खोलीवर आली. टेबलाजवळच्या एका खुर्चीवर बसून एक सिगरेट त्याने शिलगावली. मी नुकताच झोपून उठून स्टोव्ह पेटविण्याच्या विचारांत होतों. पण आधी सिगरेट ओढण्याची लहर आल्याने आणि पेटींत सिगरेट आहे या कल्पनेने मी टेबलावरची सिगरेट-बॉक्स घेऊन काडी शोधायला लागलों. अप्पाने झट्दिशी आगपेटी दिली. पण पाहतों तों माझ्या पेटींत सिगरेटच शिल्लक नव्हती. त्रासिक मुद्रेने मीं तें रिकामें डबडें कोपऱ्यांत भिरकावून दिलें. अप्पाने स्वतःची सिगरेट पुढे करून म्हटलें, "यांतली घ्या की." मी सिगरेट पेटविणार इतक्यांत माझें लक्ष कागदाकडे गेलें.

" कोणती ? लंडन नेव्ही कट् ! डॅम इट ! आपण नाही असली भिकार सिगरेट ओढत." ती पेटी आणि ती सिगरेट त्याच्याकडे फेकीत मीं म्हटलें. शांतपणें त्यानें ती सिगरेट पुन्हा पेटींत टाकली आणि पेटी खिशांत ठेवून दिली.

" हं, काय ? कधी येणार राहायला मिस्टर ? " मीं विचारलें.

" येणार आहे आजपासून."

" मग टाका ना आणून सामान एकदा. आज आणा झालं. हमालाला द्या दुपारीं पाठवून. मी खोलीवरच आहें. मग पाठवाल ना आज सामान ?"

" सामान ना ? " तो हसून म्हणाला. त्याच्या हसण्यांत कुत्सितपणा होता. " टाकीन आणून आज; पण तुम्ही कांही दुपारीं वाट पाहूं नका. आणीन सवडीनं."

मीं स्टोव्ह पेटविला. दोन कप चहा केला. एक कप त्याला दिला व दुसरा मीं घेतला. चहा घेत तो म्हणाला, " हें बघा ! आज मी चहा घेतों. पण पुन्हा तुम्ही माझ्याकरिता चहा करीत जाऊं नका. मी माझा चहा बाहेर घेत जाईन." हे सांगतांना त्याची चर्या इतकी तिरसट पण गंभीर होती, की त्याबद्दल नकार देणें अगर " जाऊं द्या हो, त्यांत काय एवढं ? " असें म्हणणेंहि मला शक्य नव्हतें.

रात्रीं साडेआठच्या सुमारास अप्पा पुन्हा आला. त्याच्या डाव्या हातांत एक आरामखुर्ची होती, उजव्या बगलेंत एक वळकटी होती आणि दोनतीन दाते मोडलेली एक फणी, ओलेपणींच कागदांत गुंडाळल्याने कागदाला घट्ट चिकटलेली एक साबणाची वडी इत्यादि सामान होतें. आरामखुर्चीचें कापड स्वच्छ व दणकट नव्हतेंच. तिच्या दांड्याचे खिळे किंचित् ढिले झालेले होते. वरच्या दांड्याच्या आणि मधल्या काठीच्या जॉईंटमध्ये बसलेल्या ढेकणांची शिकार केल्याचें तेथील डागांवरून सहज दिसत होतें. चारी जॉइंट्समध्ये अजून ढेकणांची प्रजा आहे व ती वाढली आहे हें ढेकणांच्या अंड्यांचे जे काळेकाळे ठिपके होते, त्यांवरून लक्षांत येई.

अंथरुणांत गुंडाळून आणलेल्या एका केरसुणीच्या बुंधाटाने त्याने खोली साफ केली. एक फाटकी सतरंजी, त्यावर एक काळी घोंगडी आणि

पांघरायला एक विसविशीत झालेली मळकट चादर हें अप्पाचें बेडिंग होतें! शेजारींशेजारीं दोन पुस्तकें मांडून व त्यावर दुसरीं दोन ठेवून आणि अंगांतल्या सदऱ्याचा बोळा करून व तो त्या सर्वांवर ठेवून अप्पा आपलें उसें तयार करी.

त्याने आपली झोपण्याची जागा कशी बरोबर हेरली! जी बाजू वाईट म्हणून मीं व कुसुमने अप्पाला द्यायची मुक्रर केलें होतें, त्याच ठिकाणीं त्याने आपली पथारी पसरली. त्या बाजूच्या खिडकींतून पलीकडल्या बंगल्यांतील मागल्या गॅलरींत येऊन उभ्या राहिलेल्या दोन मुली बिजलीच्या दिव्यामुळे किती छान दिसत होत्या! अप्पा यायच्या आधी मी त्याच बाजूला सिगरेट ओढीत आणि सिनेमांतलें एक पद गुणगुणत उभा होतों. अप्पा आल्यावर मी माझ्या कॉटवर आलों होतों. अप्पाने एकदा खिडकीवाटे बाहेर पाहिलें, झाडून अंथरूण घालून तो पुन्हा एकदा खिडकीजवळ गेला व त्याने ती खिडकी बंद करून आंतून कडी घालून टाकली.

" अगदीच अरसिक आहांत बुवा तुम्ही! अहो, सौंदर्याचं समीक्षण करायचं का तें असं दृष्टीआड करायचं?"

" अहो, मुलुखाचे अरसिक आम्ही! आम्हांला स्त्रीजात म्हणजे वर्ज्य! कार्तिकस्वामीचे बापच म्हणाना!" आणि किंचित् आवाज बदलून व जरा सहानुभूतीच्या आवाजांत तो म्हणाला, " अवघड आहे हो शरद जगांत जगणं. या मुलींनी उद्या अमका अमका माझ्याकडे पाहत होता म्हणून तक्रार केली तर? नुसतं खिडकींत उभं राह्यचीहि चोरी असते आमच्यासारख्यांना! नाही यायची कल्पना तुम्हांला!" त्याचा आवाज किंचित् कातर झाला होता.

पण त्या कातरतेचा माझ्या मनावर कांहीच परिणाम झाला नाही. ती खिडकी बंद झाल्याने मलाहि समोर चोरटी नजर टाकणें अशक्य झालें होतें, त्याचा राग माझ्या मनांत होता. मीं आंबट चेहरा करून म्हटलें, " अगदीच भित्रे आहांत बुवा! ही खिडकी आपल्या मालकीची आहे. आम्ही वाटेल तसं उभं राहूं. आमचा हक्क आहे. भाडेकऱ्यानं असं उभं राहूं नये, असा कांही कायदा नाही!"

" आमचं वाचनच कमी हो! कायद्याचं इतकं ज्ञान नाही आम्हांला.

तुम्ही आपले तिकडच्या खिडकींतून खुशाल बाहेर बघा!" अप्पा उपहासाने हसत म्हणाला आणि पुढे बोलणेंच खुंटलें.

आणखी एकदोन दिवसांनी लाकडी कॉटचे दोन लोखंडी पाय त्याने खोलीवर आणून टाकले, तेहि असेच जुनाट दिसत होते. या जगांत सुख आणि दुःख बरोबरच अनुभवायला येतात यांत कांही शंका नाही. मनासारखी खोली, चिल्लासारखी प्रेयसी आणि पाण्यासारखा पैसा इत्यादिकांच्या परिसरांत मी सुखसागरांत डुंबत राहिलो असतों. पण अप्पाच्या वास्तव्याने माझ्या खोलीला जुन्या बाजाराचें स्वरूप येऊं पाहत होतें.

कॉलेज सुरू होऊन आता दोन महिने होऊन गेले होते. कुसुमचें आणि माझें प्रेम आता सगळ्यांनी ओळखलें होतें. आमच्या मैत्रीला कोणाचीच हरकत नव्हती. आणि असायचें कांही कारणहि नव्हतें म्हणा! मी देखणा होतों, हुषार होतों. कॉलेजांतील स्पोर्ट्स्‌मध्ये, सरस्वती मंडळांत व डिबेटिंग यूनियनमध्ये मीं नांवहि कमावलें होतें. रानड्यांच्या तोलाला पुरेल इतकी संपत्ति मजजवळ खास होती. उद्या मी प्रोफेसर होऊन अगर डॉक्टरेटची पदवी घेऊन चांगल्याशा पगारावर निश्चितपणें स्थिर होणार होतों. माझ्यांत कमी असें काय होतें?

कुसुम माझ्या खोलीवर येई. कुसुम आली आणि गप्पा मारीत बसण्याचा तिचा रंग दिसला, की अप्पा बाहेर निघून जाई. तें एकंदरींत बरेंच होतें. अप्पा नेहमी दारांत एक आरामखुर्ची टाकून एखादी भिकार सिगरेट ओढीत पडलेला असे. सिगरेटचें व्यसन अगोदर लावून घेऊं नये आणि त्या ओढायच्याच तर चांगल्या ओढाव्या. ही काय घाण सगळी! दोनतीनदा तर पठ्याने विड्याच आणल्या होत्या फुंकायला! दारांतल्या खुर्चीवर पडून तो धुराचे फवारे सोडीत असे. त्याची नजरहि मला नेहमी निर्जीव आणि निःसत्त्व दिसे. त्याच्या चेहऱ्यावर हास्य क्वचितच दिसे. एकदा पलीकडचें मांजर जाळींतून टुणदिशी उडी मारून आंत आलें. खिडकीच्या कट्ट्यावर स्टोव्हवर ठेवलेल्या दुधाच्या पातेल्यांत ती उडी पडल्याने तें त्वरेने धडपड करीत खाली पडलें. पाठोपाठ ती पातेली धप्‌दिशी त्याच्या पाठींत पडली व जिवाच्या भीतीने वाट सापडेल तिकडे तें पळून गेलें. त्या प्रसंगाच्या वेळींच मीं अप्पाला अगदी खदखदून हसतांना पाहिलें होतें. खरें म्हणजे यांत काय

हसायचें ? बौद्धिक कोट्या, सिनेमावरच्या टीका, नटींचीं चित्रें इत्यादीवर बोलण्यांत तो भागच घेत नसे. गोष्टी अशा फारशा तो वाचत नसेच.

बहुधा दर शनिवारीं दुपारीं कुसुम माझ्याकडे येई. आम्ही चांगल्या दोन-चार तास गप्पा मारीत असूं. कधी संध्याकाळीं फिरायला नाही तर सिनेमाला जात असूं. अप्पा बहुधा अशा वेळीं खोलींत नसेच. असलाच तर आम्ही त्याला नुसती रीत म्हणून बरोबर चलण्याबद्दल म्हणत असूं. पण तो कधीहि बरोबर येत नसे.

त्या दिवशींहि असेंच झालें. कुसुम आली होती दुपारींच. अप्पा खोलींतच होता. पण त्याने अशा खुबीने आरामखुर्ची दारांत ठेवली होती, की त्याची पाठ आमच्याकडे येई. आमच्या बोलण्याकडे त्याचें लक्ष नव्हतेंच. कुठलें तरी पुस्तक वाचीत अन् विड्या ओढीत स्वारी पडली होती.

गप्पा संपल्यानंतर सिनेमाला जायचा घूट निघाला. साडेतीनच्या शोला जायचें आम्हीं ठरविलें. पावणेतीन वाजून गेले होते. आम्ही लगेच निघालों. अप्पा तसाच खुर्चीवर रेलून पडला होता. छातीवरचे केस चोळीत, नवीन विडी पेटविण्याच्या तयारींत तो होता.

"चलतोस ना रे अप्पा सिनेमाला ? चांगला आहे म्हणे 'खजांची'."

"कांही नको. डोकं दुखतंय् माझं." अप्पा म्हणाला.

"त्या भिकारड्या विड्या ओढून तें आणखी फिरेल. इश्श ! विड्या रे कसल्या ओढतोस अप्पा ? अन् खरंच, आईचा निरोप सांगायचा विसरलेंच की ! तुला तिनं तीनच्या आंत बोलावलंय. काल तीं लुगड्यांचीं वाणं आणलीं होतींस ना ? तीं परत करून नवीन आणायचीं आहेत वाटतं. लवकर जा हं."

"बरं." एवढंच अप्पा म्हणाला.

सिनेमा संपल्यानंतर मी रानड्यांकडे जेवून परत आलों. माझ्या सगळ्या वृत्ति बहरून गेल्या होत्या अगदी. मला कांही तरी चाळा पाहिजे होता म्हणून मी सहज माझ्या ट्रंकेंतलें सारें सामान बाहेर काढून ट्रंक झाडीत होतों. गेल्या सुट्टींत माझा आणि माझ्या मावसबहिणीचा तिच्या लग्नाच्या वेळीं जो फोटो आम्हीं सहज काढला होता, तो तळाशीं होता; तोहि मीं वर काढून ठेवला. खोलींत अप्पा होता. आपला फोटो कुणाला तरी दाखवावा

असें माणसाला वाटतेंच. मीं त्याच्यापुढे तो फोटो करून म्हटलें, " हा माझा आणि माझ्या मावसबहिणीचा फोटो. गेल्या वर्षीं काढला. आम्ही लहानपणापासून एकाच घरांत वाढलों."

" हं. तुम्हां लोकांना खूपच बहिणी असतात नाही? इथं पुण्यालाहि एखाद्या बहिणीबरोबर काढलाय् की नाही फोटो?" नेहमीच्या उपहासांत अप्पा म्हणाला.

" तुम्हां लोकांना जगांत काय नेटकं दिसायचंय्?" एवढेंच बोलून मी विषय आखडता घेतला. अप्पाला फाडफाड बोलावें असें माझ्या मनांत होतें खरें म्हणजे. पण तो विषय मीं एवढ्यावरच सोडला. अप्पाची म्हणजे मला भीति वाटे असें नाही; पण त्याचा थोडा दरारा होता हें खरें. अन् शिवाय एकदा चिडला तर तो काय बोलेल कुणास ठाऊक!

कांही दिवसांनी दिवाळीची सुट्टी आली. मी महिन्यासाठीं कल्याणला जाणार होतों. कुसुमला किती वाईट वाटत होतें! तिला अगदी बेचैन झालें होतें. तिची ती प्रेमळ धांदल अन् काळजी पाहून काकू एकदा म्हणाल्यासुद्धा, " कशाला जातोस शरद कल्याणला? राहा झालं इथंच!" पण ' बहीण यायची आहे ' ही सबब सांगून मी त्यांची सूचना उडवून लावली.

" भाऊबिजेचा हक्क सांगून आज बहीण कल्याणला नेती आहे; पण पाडव्याचा हक्क उद्या कुणी तरी सांगेल अन् ऐन दिवाळींत तार करून बोलावील तेव्हा समजेल!" लीला खवचटपणें म्हणाली. आधीच रडकुंडीला आलेली कुसुम आता मात्र पुरी चिडली!

" गप्प बैस हं ताई. बघ ना ग आई!" कुसुम रडक्या आवाजांत म्हणाली.

" काय ग चहाटळपणा करतेस लीले!" काकू लटक्या रागाने म्हणाल्या. पण खरें म्हणजे त्यांनाहि कुसुमची चेष्टा करण्याची ऊर्मि आवरत नव्हती. त्या हसत म्हणाल्या, " नाही तर असं कर कुसुम, तूंच जा चार दिवस कल्याणला म्हणजे झालं."

" हें ग काय आई! अशानं मी रडेन हं." कुसुम लहान मुलीच्या लडिवाळपणाने फुरंगटून म्हणाली. खरें म्हणजे तिचा तो बालिशपणा तिच्या वयाला न शोभणारा होता. पण मला तोच किती आकर्षक वाटला!

दुसऱ्या दिवशीं कल्याणला जातांना कुसुम अन् कान्त दोघेंहि मला पोचवायला स्टेशनवर आलीं होतीं. सामान बरेंच होतें म्हणून काकूंनी अप्पाला सामान घेऊन अगोदरच पुढे पाठविलें होतें आणि खिडकीजवळची जागा नीट धरून ठेवण्यास निक्षून सांगितलें होतें.

मी, कुसुम अन् कान्त स्टेशनच्या फलाटावरून हिंडत होतों. कान्त आमची मजेदार चेष्टा करीत होता आणि अप्पा माझ्या जागेवर राखण म्हणून बसला होता. गाडी सुटण्याची वेळ जवळ येतांच मी प्रणयीजनांच्या तत्परतेने कुसुमला एकटीला दुसरीकडे काढलें. प्रसंग ओळखून कान्त लांब गेला. तेवढ्या थोड्या वेळांत आम्हीं खूप बोलून घेतलें, गोड चेष्टा झाल्या आणि लटकीं रागावणीं नि रुसणींहि झालीं. आणि त्यांतच आठवड्यांतून निदान तीनचार तरी पत्रें परस्परांना पाठविण्याचें ठरलें.

इतक्यांत अप्पा तेथें आला. अप्पाला पाहून मला आठवण झाली. कुसुमला भेट म्हणून देण्याकरितां मीं सिटी स्टोअर्समधून एक टॉयलेट-बॉक्स विकत आणली होती. ती द्यायला संधीच मिळाली नव्हती. मीं कुसुमला टॉयलेट-बॉक्स तिच्याकरितां विकत घेतल्याचें सांगितलें आणि अप्पाला म्हटलें, " अप्पा, उद्या रानड्यांकडे जाणार आहेस ना ? ती परवाची टॉयलेट-बॉक्स दे या बाईसाहेबांना."

" अप्पानं नको घरीं येऊन द्यायला. उगीच मग ताई अन् आई नाही नाही तें बोलतील. मीच घेऊन जाईन रे अप्पा तुझ्या खोलीतून. दुपारीं खोलीवरच असतोस ना तूं ?"

पण अप्पाचें लक्ष कुठें होतें तिच्याकडे ? दोन्ही पाय तुटलेला आणि हाताचीं बोटें महारोगाने सडलेला एक भिकारी खुरडत चालला होता, त्याच्याकडे तो एकाग्रतेने बघत होता. तरुण सुंदर पत्नीचा त्याग करून निर्वाणपदाच्या प्राप्तीकरिता निघालेल्या गौतमबुद्धाचें छायाचित्र जर कुणाला पाहिजे असेल तर त्याने अप्पाचा त्या वेळीं फोटो घ्यावा असें मला वाटलें.

इतक्यांत गाडी सुटण्याची घंटा झाली आणि मला गाडींत चढावें लागलें.

कल्याणला गेल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं मीं एक लांबलचक पत्र टाकलें. त्याचें उत्तरहि कुसुमनें लगेच लिहिलें. किती गमतीदार होतें तें पत्र ! कुसुम मुलखाची लबाड होती. ती टॉयलेट-बॉक्स आणायला गेली नव्हती. कारण

काय दिलें होतें? तर म्हणे, मी नसतांना तिचें मनच मुळी खोलींत जायला घेत नसे!

तिचें कारण मला पटलेंहि. तरी सुद्धा दिवाळीच्या अगोदर तिला ती पेटी मिळावी अशी माझी इच्छा असल्याने तिने खोलीवर जाऊन पेटी घेऊन यावें अशी माझी इच्छा मीं दुसऱ्या पत्रांत प्रदर्शित केली.

या पत्राच्या उत्तराची वाट बघतां बघतां चार दिवस निघून गेले. पण कुसुमकडून एका ओळीचेंहि पत्र आलें नव्हतें.

मी अगदी अस्वस्थ झालों होतों. वेडाच झालों होतों म्हणा ना! नाना तऱ्हेच्या कल्पना माझ्या मनांत येत. शेवटीं मीं एक मोठें प्रेमपत्न पुन्हा लिहिलें. त्यांत अनेक गोष्टी होत्या. विरहाग्नींत मी कसा होरपळून निघालों आहें याचें काव्यमय वर्णन होतें व शेवटीं लिहिलें होतें, "तुझें पत्र जर चार दिवसांत आलें नाही तर मी लगेच पुण्याला निघून येईन!"

तिसऱ्याच दिवशीं पत्र आलें. खूप लांब होतें तें. पत्र कसलें तें! माझ्या प्रेमाचें मृत्युपत्नच होतें एका अर्थानें! मायन्यांत 'प्रिय' वगैरे कांहीच नव्हतें. नुसतेंच 'श्रीयुत' होतें. यापुढे प्रेमाच्या नाटकी भाषा वापरून मुलींना फसविण्याचे चाळे बंद करण्याबद्दल तिने निक्षून सांगितलें होतें. माझें सत्यस्वरूप तिला अप्पाकडून एका प्रसंगानें चांगलेंच कळलें होतें. तो प्रसंग तिनें वर्णन केला होता तो असा—

त्या दिवशीं दुपारी किंचित् मळभ आलें होतें. तिला सारखी माझी आठवण होत होती. कुठें तरी बाहेर पडावें म्हणून ती बाहेर पडली. रस्त्यावर येतांच तिला टॉयलेट-बॉक्सची आठवण झाली. लगेच तिचे पाय माझ्या खोलीकडे वळले.

कुसुम खोलींत गेल्यावर अप्पा जरा सावरून बसला व हसून नेहमीच्या उपहासगर्भ आवाजांत म्हणाला, "अं! कुसुमताई! या वेळीं कुणीकडे इकडे? शरद कल्याणला गेल्याचं विसरलांत वाटतं?"

"नाही. शरदकडेच नेहमी यावं असं थोडंच आहे? आज तुझ्याकडे मुद्दाम आलें आहे."

"माझ्याकडे! अन् मुद्दाम? कां बुवा? घरीं कांही मेजवानीचा थाट

मांडायचा बेत दिसतोय्! मग काय चक्का आणून द्यायचा की केळींच आणायचीं शिक्रणीला?" अप्पा खदखदा हसून म्हणाला.

"नाही रे! तसं कांही घरचं काम नाही तुझ्याकडे. माझंच काम आहे. म्हणून मुद्दाम मी आलें आहें."

"तें तर मीं ओळखलंच." अप्पा एक विडी शिलगावीत म्हणाला. "अहो, कामाशिवाय कोण कुणाकडे जातंय्? आमच्यासारख्यांच्या घरीं कुणीहि आला कीं समजावं खुशाल त्याचं कांही तरी काम अडलंय् म्हणून."

कुसुमने किंचित् अविश्वासाची मुद्रा केली. तिच्याकडे पाहून तो म्हणाला, "खरंच आहे हें. खोटं वाटतं की काय तुम्हांला? आमचा जन्मच मुळीं कामासाठीं असतो कुसुमताई. गंमत सांगतों तुम्हांला एक. आमच्या वडगांवला आमच्या घराशेजारींच एक 'गंगाराम महाजन' नांवाची व्यक्ति राहायची. गरीब होता तो अगदीं. कित्येक वेळां खायचीसुद्धां भ्रांत पडायची! पण फार चांगला होता तो. इतर सार्वजनिक कामं खूप करी. मुख्य काम म्हणजे प्रेतं पोचवायचं. आणि कुणाच्याहीकडे कुणी मेलं की महाजनची तयारी अगदी कडबा अन् बांबू आणण्यापासून असायची. त्याच्याकडे कुणी कधी जात नसत; पण अशा वेळीं मात्र हटकून जात. एकदा आमच्या गावांतले वकीलसाहेब त्याच्याकडे गेले आणि आर्जवी चेहरा करून म्हणाले, "महाजन, एक काम होतं बघा तुमच्याकडे."

"'बोला ना वकीलसाहेब!' महाजन म्हणाला, 'अहो, कामाशिवाय कोण येतंय् माझ्याकडे? हं, आज कोण मयत झालं? तुमच्या सासूबाई वाटतं? बरं, तुम्ही व्हा पुढं. हा मी आलोच.' वकीलसाहेब चाट होऊन परत गेले. तसंच आमचं. हं, मग काय काम होतं?"

कुसुमला त्याचें बोलणें आवडलें नसावें. ती म्हणाली, "टॉयलेट-बॉक्स आणून ठेवलीय् ना शरदनं? ती न्यायला आलेंय्."

अप्पा किंचित् हसून म्हणाला, "हा शरद म्हणजे मोठा चमत्कारिकच माणूस दिसतोय. निरनिराळ्या वस्तु निरनिराळ्या लोकांकरितां ठेवून जातो आणि त्यांचं वाटप करायचं काम येतं माझ्याकडे. आता हेंच बघा. ती फडक्यांची नवी कादंबरी त्या कुसुम तुळपुळेला द्यायला सांगितली आहे.

तसंच आज सकाळीं ती पुष्पा परांजपे आली अन् म्हणे—शरदनं माझ्याकरिता पत्र ठेवलंय् तें द्या! तें दिलं."

कुसुमला अगदी न राहवून तिने विचारलें, "कोण पुष्पा परांजपे? ती शरदकडे येते?"

"तें कांही विचारूं नका. अहो, किती मैत्रिणी म्हणून सांगूं! पुष्पा आहे, कुसुम तुळपुळे आहे शिवाय आणीक किती तरी! आणि सगळ्या बहिणी बरं का. अगदी तुमच्यासारख्या..."

कुसुमला मनस्वी राग येऊन ती एकदम ओरडली, "अप्पा! भलतंसलतं बोलूं नकोस बरं का! मला आवडायचं नाही!"

"बरं राह्यलं! आमचं काय? खरं सांगितलं तरी भलतंसलतं अं? बोलायचा नाही एक अक्षर यापुढं!"

असें म्हणत त्याने ती टॉयलेट-बॉक्स काढून दिली. कुसुमने ती काळजीपूर्वक उघडली. तों आंत कसला तरी फोटो तिला दिसला! त्याकडे लक्ष गेल्यासारखें करून अप्पा ओरडला, "अरे बाप रे! हा फोटो कसा राहिला इथं? आणा कुसुमताई तो फोटो."

कुसुमने तो फोटो बघितला. एका तरुण मुलीबरोबर काढलेला तो माझा फोटो होता. आढेवेढे घेत अप्पाने अनेक कल्पित कथा तिला सांगितल्या. माझ्या एका प्रेयसीचा तो फोटो असल्याचें अप्पाने तिला खात्रीपूर्वक सांगितलें; आणि मग तिचें मन माझ्याविषयीं पूर्ण बिथरलें.

या प्रसंगाची माहिती लिहून तिने लिहिलें होतें, "शरद, तूं असा असशील अशी कल्पनादेखील नव्हती! हिरा म्हणून हातांत घेतला आणि ती गारगोटी निघाली! आता यापुढं आपला संबंध तुटला! तूं तुझ्या नव्या मैत्रिणीबरोबर तरी प्रामाणिपणानं वागशील अशी मी (वेडी) आशा करतें."

पत्र वाचतांच सर्व गोष्टी माझ्या ध्यानांत आल्या. माझ्या मावसबहिणीबरोबर काढलेला फोटो मीं एकदा अप्पाला दाखविला होता. तो माझ्या बॅगमधून चोरून त्याने हें कपटनाटक रचलें होतें. किती दुष्ट आणि कारस्थानी माणूस होता अप्पा! त्याच्याविषयीच्या चिडीने माझें मन भरून गेलें. मी लगेच दुसऱ्याच दिवशीं पुण्याला गेलों. कुसुमचें समाधान मी तात्काळ करूं शकलों. मीं मुळी माझ्या मावसबहिणीचा आणि तिच्या नवऱ्याचा

फोटोच तिला दाखवला. लगेच सर्व गैरसमज दूर झाले. वातावरण आनंदित झालें.

त्याच दिवशीं दुपारीं मीं कुसुमला अप्पाकडे चलण्याचा आग्रह केला. तिची नापसंती होतीच; पण केवळ माझ्या आग्रहास्तव ती निघाली.

आम्ही गेलों तर अप्पा बाहेरच्या बाजूस विडी ओढीत पडला होता. मला बघून तो किंचित् बिचकलाच! पण नंतर सावरून म्हणाला, "या मंडळी! अरे! पण हे कल्याणकर कसे आले इतक्या लवकर? काय हो, पुण्याबाहेर चार दिवससुद्धा चैन नाही का पडलं?"

विनोदी वातावरण निर्माण करण्याचा त्याचा प्रयत्न मीं ओळखला. मीं गुर्मीने उत्तर दिलें, "अहो, तुमच्यासारखे लोक आहेत ना आमची काळजी घ्यायला! तुम्ही बोलावतां आम्हांला म्हणून आलों तुमच्या भेटीला."

"माझ्या भेटीला?" नेहमीच्या पद्धतीने हसत तो म्हणाला, "काय काम आहे बुवा तुमचं माझ्याकडे?"

"अहो, तुम्ही भानगडी करतां अन् त्या निस्तरण्याकरितां यावं लागतं आम्हांला."

त्याने नुसत्या नजरेनेच विचारलें, "कसली भानगड? काय केलं मीं?"

आता मात्र माझा संताप अनावर झाला. मी एकदम ओरडलों, "बेशरम! लाज नाही वाटत तुला असलीं कामं करायला? स्वतःच्या अंगांत मुळीच कर्तबगारी नाही, तुझ्या त्या फडतूस काळ्याबेंद्या शरीराकडे कुणी ढुंकूनसुद्धा बघत नाही, म्हणून तूं असले उद्योग करतोस! चांगला जागलास रानड्यांच्या अन्नाला! आजपर्यंत त्यांनी—"

मीं अप्पाकडे सहज बघितलें तर तो एका विडीवर दुसरी विडी निर्विकारपणाने पेटवीत होता. मीं थांबल्याचें बघतांच तो म्हणाला, "हं, चालू दे! लक्ष आहे माझं. 'रानड्यांच्या अन्नाला चांगला जागलास...' इथपर्यंत आला आहेस तूं. आता पुढं फक्त पांचच मिनिटं वेळ आहे मला नंतर मी तुम्हां दोघांना खोली मोकळी करून देईन."

त्याचे भाषण ऐकून मी तर अगदीच थिजून गेलों! मी विचित्र नजरेने त्याच्याकडे पाहत असतांना तो म्हणाला, "अरे! संपलं वाटतं? रानड्यांचं

अन्नच संपलेलं दिसतंय. ठीक आहे. आपल्याला तरी कुठं आहे जरुरी? रानडे नाहीत तर एखादे गोखले गाठावे आता." असें बोलून तो उठला आणि कोट घालीत म्हणाला, "अच्छा! जातों मी. आता होऊं दे सुरवात गुलाबी कोडीं सोडवायला." भेसूरपणाने हसत अगदी शांतपणें तो बाहेर गेला.

मी आणि कुसुम दोघेंहि सर्दच झालों. त्या दिवशीं आम्ही अप्पाच्या स्वभावावरच बोलत होतों. काकूंनी कलियुगाला दोष दिला. नानांनी सांगितलें, की "कांही माणसांचे स्वभावच मुळी असे असतात! त्यांच्यावर कितीहि उपकार करा, ते जातीवर जायचे! प्रत्येकाने निरनिराळे मुद्दे काढले. त्या दिवशीं त्या चर्चेचा शेवट झाला नाही. पण दुसऱ्या दिवशीं माझ्या हातांत पोस्टमनने अप्पाचें एक पत्र टाकलें आणि मग माझ्यापुरता तरी त्या चर्चेचा शेवट झाला. तें पत्र असें होतें—

प्रिय शरद,

कालच्या प्रसंगानंतर 'प्रिय' या शब्दाने सुरवात केलेल्या पत्राची अपेक्षा तूं नक्की केली नसशील. कदाचित् कुसुम याला निर्लज्जपणाचा नमुनाहि म्हणेल. पण तें कांही असलें तरी तूं माझें हें शेवटचें पत्र अवश्य वाच. यापुढच्या जीवनांत तूं आणि कुसुम प्रेमालाप करतां करतां जेव्हा कधी कधी मागील आयुष्याच्या आठवणी काढाल तेव्हा माझा उल्लेख किती तिरस्काराने कराल याची मला पूर्ण कल्पना आहे. त्याच तिरस्कृत व्यक्तीचें अंतरंग पाहायचा तुम्ही एवढें पत्र वाचून प्रयत्न कराल का?

शरद, तुझ्या आणि कुसुमच्या प्रेमांत व्यत्यय आणण्याचा मीं यत्न केला ही गोष्ट खरी आहे. तुमच्या भकास जीवनाचीं भावी दृश्यें मी अनेक वेळां रंगवीत असें. हसण्या-खिदळणाऱ्या, गुलगुल गोष्टी करणाऱ्या, गडकऱ्यांच्या गुलाबी कोड्यांत रंगून जाणाऱ्या तुम्हां दोघांना एकदा भरपूर रडतांना पाहावें असें माझ्या मनांत होतें. माझ्या या स्वभावाबद्दल तुम्ही मला नांवें ठेवाल हें मला माहीत आहे. पण मी असा विघ्नसंतोषी कां बनलों?

माझी ही वृत्ति माझ्या जीवनांतूनच निर्माण झालेली आहे.

मी अगदी गरीब कुळांत जन्माला आलों. वंशपरंपरा कुलकर्णी-वतनावर आमचें घराणें वाढलें. कुलकर्णी-कायदा पास होऊन तलाठी नेमण्याची पद्धत सुरू झाल्यापासून पूर्वी जी गावांत थोडीफार अरेरावी करतां येई तीहि

येईनाशी झाली. तलाठ्याला पगार तो कितीसा असणार? पंचवीस रुपयांत माझ्या वडिलांना आम्हां तिघां भावांचा आणि त्या दोघांचा असा पांचजणांचा संसार पाहावा लागे. तिखटामिठाला सुद्धा खरें म्हणजे पंचवीस रुपये पुरावयाचे नाहीत. पण माझी आई कशी तरी पीठमीठ करून संसार चालवी. आमच्या गावांत ब्राह्मणांचीं सारीं तीन घरें—एक आमचें, दुसरें मामलेदारांचें आणि तिसरें इनामदारांचें. त्या दोघांच्या घरांत माझ्या आईचा गरिबीमुळे अपमान होई. मामलेदारीण अगर इनामदारीणबाईसारखीं टोपपदरी लुगडीं अगर दाण्यासारख्या मोत्यांची नथ तिला कधीच मिळत नसे. माझ्या बरोबरीचीं त्यांचीं मुलें माझ्याबरोबर तालुक्याच्या गांवीं शिकायला जात. तेथे त्यांचा कोण रुबाब! तसल्या गावढ्या गावांतहि त्यांनी त्यांचें मित्रमंडळ निर्माण केलें होतें. थोरामोठ्यांचीं मुलें म्हणून सर्व लोक त्यांचें कौतुक करीत.

या सगळया वातावरणाचा माझ्यावर कांहींच परिणाम होत नसेल? मी कौतुकाकरितां भुकेलेला होतों. पण घरींदारीं, जिकडेतिकडे माझी गरीब म्हणून उपेक्षा होई. माझ्या गुणांचें वास्तविक मोलसुद्धां कुणी कबूल करीत नसत. उलट इनामदारांच्या मुलामुलींचें कौतुक सर्व गाव करी. यामुळे माझें मन त्या लहानग्या वयांत सुद्धां चिडून जात असे. सूडाची तामसी भावना तिथे नेहमी पेटत राही.

अशाच परिस्थितींत मी मॅट्रिक झालों. कॉलेजचा खर्च करण्याची कुवत वडिलांच्या अंगीं नव्हती. मला त्या वेळीं वडिलांचा इतका राग आला होता! त्या दिवशीं मी त्यांना फाडफाड बोललोंदेखील. अखेर शेजारच्या मामलेदारांच्या चांगुलपणाने माझी कॉलेजची वाट मोकळी झाली. त्यांनी रा. ब. रानड्यांना चिठ्ठी दिली. रानड्यांनी मला दोनचार शिकवण्या मिळवून दिल्या. रानड्यांच्या ओळखीमुळे मला कॉलेजांत फ्रीशिपहि मिळाली.

अर्थात् त्या मोबदल्यांत मला रानड्यांकडे कांहीं कमी राबावें लागलें नाहीं. काकूंना पूजेचीं फुलें आणून देणें, घरांतलें अडलेंपडलें काम करणें, कधी बाजारहाट करणें इत्यादि कामें मला करावीं लागत. एखाद्या चांगल्या सिनेमाला खूप गर्दी असली व तिकिटें काढणें थोडें त्रासाचें असलें कीं काकूंना हटकून माझी आठवण व्हायची! साऱ्या कुटुंबाला सिनेमाला नेऊन आणण्याची कामगिरी मग माझ्यावर पडे. त्यांना बॉक्समध्यें बसवून मला

चार आण्यांत जावें लागे हा भाग वेगळा! स्वतः रावबहादुरांना तत्त्वज्ञानाची फार आवड! जीवन ही माया आहे आणि ब्रह्म हें सत्य आहे या मताचे ते आहेत. त्यांची दृष्टीहि फार वाचून म्हणे बिघडते. मला कधी जन्मांत गोडी वाटली नाहीं अशीं रहस्यें—भाष्यें मी त्यांना दररोज वाचून दाखवीत असें.

माझ्या साऱ्या आकांक्षा मारल्या जात होत्या. क्रिकेट, टेनिस, संगीत, गॅदरिंग, नाटकांत काम–सारा नुसता कल्पनांचा खेळ वाटे मला! रानड्यांच्या घरांत वयांत आलेल्या कुसुम आणि लीला या दोन मुली माझ्या नजरेसमोरून नेहमी जात. मी जरी स्वतंत्र खोली घेऊन राहिलों होतों तरी माझा तळ बरेच वेळां रानड्यांकडे असे. त्यांच्यापैकीं एखादीला कधी वेणी, कधी गार्टर, कधी चांगली फुलें, कधी शेपटे मी आणून देई. या साऱ्या सहवासाचा माझ्या मनावर परिणाम झाल्यास तूं मला दोषी धरशील काय?

जिकडून तिकडून मी उपेक्षिला जात होतों. माझ्या गुणांना कधी वाव मिळत नव्हता. माझ्याबद्दल कुणी आस्था दाखवीत नव्हतें. इतरांचें तरी बरें कां पाहावें, असें मला वाटूं लागलें. लोकांचें नुसतें कौतुक करण्याची मला चीड येई. मला माझें थोडें फार तरी कौतुक व्हायला पाहिजे होतें. पण तें शक्य नव्हतें. तुमचें वाईट करण्याचे विचार माझ्या मनांत येऊं लागले. तुझ्या त्या फोटोनें मला तशी संधि दिली. मीं तिचा उपयोग करून घेतला.

आता तुमच्यांतले गैरसमज दूर झाले याबद्दल मला आनंद वाटतो. तुला हें बोलणें कदाचित् मानभावीपणाचें किंवा बेशरमपणाचें वाटेल. पण खरेंच सांगतों, की मला आनंद वाटतो. साऱ्या अपमानांची आठवण व्हायला लागली म्हणजे डोकें अगदी फिरून जातें. वेड्यासारखें रस्त्यांत ओरडत सुटावें आणि साऱ्या जगाला शिव्या द्याव्या, असें वाटतें. अशा एका भयानक क्षणांत मीं तो फोटो कुसुमला दाखविला आणि तुमच्या प्रेमांत बिब्बा घालण्याचा यत्न केला. मी कांही मूळचा वाइट नाहीं रे शरद! बेभान अवस्थेंत मी चुकलों. मला क्षमा कर अगर करूं नकोस; पण निदान एका उपेक्षिताचें अंतरंग तरी तूं सहानुभूतीनें पाहशील का?

तुझा एके काळचा मित्र

**अप्पा**

## अप्पाची देशभक्ति : ७ :

मी आणि अप्पा दोघेहि एकाच वर्षी बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झालों. मला सेकंड क्लास मिळाला, तर अप्पाला साध्या पास क्लासावरच समाधान मानून घ्यावें लागलें. अप्पाला थर्ड क्लास मिळाला याबद्दल कुणालाच विशेषसें आश्चर्य वाटलें नाही. मॅट्रिक झाल्यापासून अप्पा रा. ब.च्याकडे आश्रयासाठी राहिला होता. रा. ब. जरी त्याला अनेक वेळां मदत करीत तरी त्यांचें त्याजविषयी चांगलें मत असें कधीच नव्हतें. त्याने जितके चांगले मार्क मिळवावेत अशी रा. ब. ची अपेक्षा होती तितके तो मिळवीत नव्हता. काकूंच्या डोक्यांत स्वतःच्या मोठेपणाविषयी आणि कान्तच्या हुशारीबद्दल इतके विचार असत, की त्यांना अप्पासारख्या दरिद्री मुलाबद्दल मत प्रकट करण्यास फुरसत नव्हती. रानड्यांचा एकुलता एक मुलगा कान्त पुण्याच्या एंजिनिअरिंग कॉलेजमध्ये होता. कॉलेजच्या अभ्यासाव्यतिरिक्त क्रिकेट, टेनिस, आसपासच्या बंगल्यांतील मुली व सिनेमा यांशिवाय त्याचे गप्पा मारण्याचे दुसरे विषय नसत. तो स्वतःला अगदी अद्यावत् तरुण समजत होता. त्यामुळे अप्पाविषयी त्याचें मत चांगलें असण्याचा फारसा संभव नव्हता. राहतां राहिली कुसुम! कोणत्या कॉलेजकन्येला अप्पासारख्या दरिद्री व कुरूप तरुणाबद्दल आत्मीयता वाटेल! कुसुमला अप्पा आवडत तर नव्हताच; पण त्याच्याविषयी एक प्रकारचा तिरस्कार तिच्या मनांत सदैव असे.

परीक्षेच्या निकालाच्या आधीच कित्येक दिवस अप्पाने नोकरीशोधार्थ मोहीम सुरू केली होती. सरकारी नोकरी योग्य वशिल्याच्या अभावीं त्याला मिळणें अशक्य होतें. लॉ कॉलेजमध्ये नांव घालून वेळ व पैसा या गोष्टींची आणखी दोन वर्षें उधळपट्टी करणें ही कल्पना त्याच्या दृष्टीने हास्यास्पद होती. राहतां राहिला प्रत्येक पदवीधर तरुणाच्या पुढे 'आ' वासून पडलेला मास्तरकीचा राजमार्ग! अप्पानेहि योग्य विचारान्तीं तोच मार्ग अनुसरला. अनेक खटपटी व लटपटी करून त्याने वडगांवच्या इंग्रजी शाळेंत नोकरी पटकावली.

अप्पाला नोकरी मिळाल्याचें ऐकून सर्वांनाच समाधान वाटलें. रा. ब. तर बोलतां बोलतां म्हणाले सुद्धा, "उत्तम झालं. आम्ही त्याला हाताशीं धरल्याचं अगदी सार्थक झालं. आमच्या मदतीवर तो बी. ए. झाला यांत आम्हांला आनंद आहे. आता त्यानं मास्तरकींतच नांव कमवावं व आपल्या आईला आणि धाकट्या भावंडांस सुखांत ठेवावं."

"मास्तरकीचा धंदा नाही तर खरोखरच बरा. कुणाच्या अध्यांत नाही मध्यांत नाही. दिवसाकांठीं चार तास पोरं शिकविलीं की जन्माची कटकट संपली." काकूंनी शेरा मारला. आणि मग त्या दिवशीं मास्तरकीच्या धंद्याविषयीच आमचें बोलणें झालें.

अप्पा साध्या पास क्लासांत आल्याबद्दल कुणाला विशेष आश्चर्य वाटले नाही; पण मला फक्त सेकंड क्लास मिळाला याबद्दल सर्वांनाच आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसला. सर्व रानडे कुटुंबांत माझ्या अंगांत असलेल्या– आणि नसलेल्यासुद्धा– गुणांबद्दल फारच अवास्तव कल्पना होत्या आणि माझ्या श्रीमंतीवर आणि सौंदर्यावर कुसुम खूष होऊन आज ना उद्या आमचें शुभमंगल होईल याविषयी कुणालाच शंका नव्हती. अर्थात् एक होतकरू भावी जामात या दृष्टीनेच ते सर्व माझ्याकडे बघत होते. त्यामुळे बी. ए. च्या वर्गांत मी पहिल्या वर्गांत येऊन शेवटीं आय्. सी. एस्. अगर बॅरिस्टर होईन अशी आशा व अपेक्षा सर्वांनाच वाटत होती. त्या सर्व अपेक्षांचा माझ्या निकालामुळे अगदी चक्काचूर झाल्यामुळे सर्वांना वाईट वाटणें अगदी साहजिक होतें.

मास्तरकी पत्करल्याबद्दल अप्पाचें पत्र आल्यानंतर माझ्या आयुष्याबद्दल

चर्चा रानड्यांच्या घरांत जोराने सुरू झाली. असेंच एकदा मी, रा. ब., कुसुम आणि कान्त बोलत बसलों होतों. भरगच्च व चमचमीत जेवणानंतर माणसाला विनोदाची जी एक चमत्कारिक लहर येते त्या लहरींत मी होतों.

एखादी गोष्ट गमतीने बोलावी तसें मी म्हणालों, "मग काय करायचं पुढं ? कांही सुचत नाही. असं निरुद्योगी राहून कसं चालेल ? नाही तर मी सुद्धा बघीन बघीन अन् मास्तर होऊन जाईन झालं!"

त्यावर कुसुम एकदम तिरस्काराने म्हणाली, "मास्तर ! इश्श ! कांही तरी बोलायचं म्हणजे काय ?"

मी मिस्किलपणाने म्हणालों, "कां ? मास्तरकी काय वाईट आहे ? तुला नाही पण निदान काकूंना तरी ती आवडते खास. त्या दिवशीं अप्पाविषयी त्या म्हणाल्या नव्हत्या का तसं ?"

मी विनोदाने बोलत असल्याचें काकूंनी ओळखलें होतें. पण विनोदांत सुद्धा त्यांना माझी मास्तरकी मान्य नव्हती. त्या एकदम म्हणाल्या, "छे छे, शरद ! भलतीच गोष्ट भलत्या ठिकाणीं लावण्याची ही कला कुठं शिकलास बाबा ! अरे, अप्पा कुठं आणि तूं कुठं ! कसाबसा आमच्या आधारावर तो शिकला आणि बी. ए. झाला ! त्यानं मास्तरकी करायची नाही तर काय करायचं ? पण तुझी स्थिति का त्याच्यासारखी आहे ?"

संभाषण खरें म्हटलें म्हणजे इथेच थांबलें असतें. पण संभाषणाच्या सुरवातीपासून आरामखुर्चीत पडून ताज्या टाइम्समधील 'इंडियन पोलिटिकल नोटस्' वाचण्यांत गढून गेलेले रा. ब. एखादी गोष्ट अगदी ठरवून बोलल्यासारखे म्हणाले, "नाही तर असं कर शरद, तूं वकीलहि होऊं नकोस अन् मास्तरहि होऊं नकोस. तूं आपला बडा मास्तर हो, झालं."

"बडा मास्तर म्हणजे काय बाई ?" काकूंनी प्रश्न केला.

आपण फार मोठा विनोद केला असें स्वतःशींच समजून रा. ब. मिस्किलपणाने हसले आणि म्हणाले, "अग, बडा मास्तर म्हणजे प्रोफेसर. एवढं समजत नाही ?" थोडें थांबून ते म्हणाले, "नाही तरी अलीकडे सरकारी नोकरींत आमच्या वेळेसारखी गंमत नाहीच राहिली. तेव्हा शरदनं शिक्षणाच्या पवित्र क्षेत्रांत प्रवेश करून घ्यावा असं मला वाटतं. परवाच आपले प्रिन्सिपल कीर्तने भेटले होते, त्यांच्याजवळ मीं विषयहि काढून ठेवला आहे."

कॉलेजमधली प्रोफेसरची जागा म्हणजे मला एक अप्राप्य वस्तु वाटत होती. खरें म्हणजे माझ्यापेक्षा हुशारीने व लायकीने श्रेष्ठ असे किती तरी विद्यार्थी आमच्या कॉलेजांत होते. पण माझी वशिल्याची लायकी सर्वांत जास्त होती. रा. ब. नी अनेक खटपटी व लटपटी करून मला एका कॉलेजांत लेक्चरर म्हणून चिकटवून घेतलें. एम्. ए.च्या परीक्षेंत सेकंड क्लास मिळविल्यानंतर माझी नेमणूक पक्की होणार होती.

माझ्या प्रोफेसरीच्या आयुष्याचा प्रारंभ मात्र सुरेख झाला. आकर्षक चेहरा, बोलण्यांतली सफाई व विद्यार्थ्यांच्या डोळ्यांत धूळ फेकतां येईल इतपत ज्ञान इत्यादि सामुग्रीवर कोणताहि प्रोफेसर मुलांमुलींच्या गळ्यांतील ताईत होऊं शकतो. यांपैकी तिन्ही गोष्टी मजजवळ होत्या; मग मुलांमुलींमध्ये मी लोकप्रिय झालों यांत नवल कसलें!

कॉलेजांतले जुने प्रोफेसर वयाने वयस्क व विचारांनी जरठ होते; पण मी मात्र त्याला अपवाद होतों. मी मुलांच्या वादविवादांत भाग घेई, संगीत-समितीमध्ये निरनिराळे कार्यक्रम यशस्वी करून दाखवी व आमच्या कॉलेजां-तलि पुरोगामी विद्यार्थ्यांचीं जीं अभ्यास-मंडळें असत त्यांमध्ये बिनदिक्कत भाग घेऊन मार्क्सवादादर चर्चा करी. लवकरच मी एक पुरोगामी वृत्तीचा व राजकीय मनोवृत्तीचा प्रोफेसर म्हणून ओळखला जाऊं लागलों व त्याबद्दल मला अभिमानहि वाटूं लागला.

स्वतः रा. ब. ना माझें हें वागणें विशेष पसंत नव्हतें; पण तें कांही बोलत नसत. काकूंना त्यांत कांहीच न कळल्यामुळे त्या कांही बोलूं शकत नसत. कुसुमला मात्र माझी ही विचारसरणी अगदी शंभर टक्के पसंत होती. महा-राष्ट्रांतल्या प्रतिष्ठित व श्रीमंत लोकांच्या मुलांमुलींमध्ये समाजसत्तावादी विचारसरणीचें दिखाऊ अनुकरण करण्याची जी एक सर्वसाधारण फॅशन पडत होती त्याच वर्गांतील ती होती.

कॉलेजच्या डिबेटिंग यूनियनमध्ये ती भांडवलशाहीविरुद्ध तावातावाने भाषण करी. प्रत्येक चैनीची व उपभोगाची वस्तु ती वापरी खरी; पण त्यावर 'बूर्झ्वा' असा शिक्का मारायला सहसा सोडीत नसे. आणि तिला जरी शेतकरी अगर कामकरीवर्गाची प्रत्यक्ष माहिती मुळीच नव्हती तरी कॉलेजच्या

त्रैमासिकांत श्रमजीवी दलितवर्गाच्या कष्टमय आयुष्याबद्दल दुःखान्त लघुकथा लिहावयास ती सहसा कचरत नसे.

नुसत्या चर्चेला आणि वादविवादाला रा. ब. यांची विशेष हरकत नसावी. पण या वर्षीं देशाचें राजकारण प्रतिदिनीं जास्त जास्त उग्र स्वरूप धारण करीत होतें. उपासमार, महागाई व गुंडांचे अत्याचार यांमुळे देशांतील लोकमत जास्त जास्त प्रखर होत चाललें होतें. हिंदुस्थानच्या राजकीय क्षितिजावर एवढें प्रचंड वादळ होणार होतें, की त्याची सूचना एखाद्या लहान पोरासोरालासुद्धा होती. काँग्रेसला एखादी प्रचंड चळवळ किंवा अंतिम लढा पुकारावा लागणार हें सर्व लोक समजून होते. ठिकठिकाणच्या राजकीय वर्तुळांतून चळवळीबाबत बोलणीं प्रत्यहीं होत. काँग्रेस अधिकाऱ्यां-कडून कधी गुप्त आदेशहि सुटत. एकूण रंग असा होता, की हिंदी-ब्रिटिश संबंध आता खेळीमेळीचे राहणार नव्हते. लवकरच प्रकरण मुद्दयावरून गुद्दयांवर येणार व मग समस्त हिंदी जीवनाचें क्षितिज गोळीबार, लाठीहल्ले, फटके व तुरुंगवास इत्यादिकांच्या काळ्याकुट्ट ढगांनी अंधारून जाणार हें अगदी निश्चित होतें.

राजकीय क्षेत्रांतील या हालचालींबरोबर रा. ब.च्या मनाची चलबिचलहि जास्त मोठ्या प्रमाणांत सुरू झाली. इतके दिवस मी व्याख्यानें देत होतों, चर्चा करीत होतों व अभ्यास-मंडळें चालवीत होतों; पण त्याबद्दल रा. ब.ना विशेष वाईट वाटलें नाही. उलट ते त्याबद्दल माझें कधी कधी कौतुकहि करीत. पण बोलक्या निष्क्रिय देशभक्तीचे दिवस आता संपले होते. आता प्रत्यक्ष संकटांना तोंड देण्याची वेळ आली होती. या चळवळींत मीं भाग घेऊं नये याबद्दल रा. ब. शक्य तितकी कोशिस करीत. काकूंनी तर मी तुरुंगांत जाणार म्हणून आत्तापासूनच सोमवारचा उपवास सुरू केला होता. फक्त कुसुम माझ्या बाजूची होती. कदाचित् तुरुंगांतील हाल-अपेष्टांची खरी परिस्थिति तिला माहीत नसावी!

माझें मन वळविण्यासाठी रा. ब. निरनिराळीं उदाहरणें देत. जिमखान्या-वरील एकाहि बंगल्यांत चळवळींत भाग घेऊन आयुष्याची माती करण्यास सिद्ध असलेला एकहि वेडा तरुण नव्हता. त्यांपैकी कुणीं कमिशनें घेतलीं होतीं, तर बाकीच्यांनी आपद्धर्म म्हणून खडकी किंवा देहू रोड हीं ठिकाणें

पकडलीं होतीं. जेव्हा त्यांच्या उदाहरणांनी माझ्या मनावर परिणाम होईना तेव्हा मला ते अप्पाचें उदाहरण देत. एकदोन वर्षांत बी. टी. होऊन वडगांवलाच स्थिर होण्याचा अप्पाचा मानस होता. त्याचें उदाहरण देऊन रा. ब. म्हणत, " त्या अप्पाला जेवढं कळतं, भावी आयुष्याची त्याला जेवढी काळजी आहे, तेवढीसुद्धा तुला नाही रे शरद ! अरे, कसली चळवळ नि कसलं राजकारण घेऊन बसलास ! तुला काय कमी आहे ? चांगली प्रोफेसरी करावी, खूप वाचावं आणि फारच तळमळ असली तर सामाजिक कार्य करावं, लेख लिहावे, गोष्टी लिहाव्या. पण हे तुरुंगांत जाण्याचे थेर काय उपयोगी ?"

असेच एकदा संध्याकाळीं आम्ही गप्पा मारीत बसलों होतों. अप्पाहि तिथेच होता. शाळेच्या कांही कामाकरिता मुद्दाम त्याला पुण्यास यावें लागलें होतें.

निरनिराळ्या राजकीय प्रश्नांवर आमच्या चर्चा चालल्या होत्या. मी, कुसुम आणि कान्त काँग्रेसच्या बाजूचे होतों. रा. ब. व काकू हीं काँग्रेसने इतक्यांत लढा पुकारूं नये या मताचीं होतीं. अप्पा कांहीच बोलत नव्हता. जणू त्याला राजकीय विषयावर मतेंच नव्हतीं ! राजकीय विषयावर मत देण्याइतपत जिवंतपणाच त्याच्यामध्ये शिल्लक नसावा !

संभाषणाच्या ओघांत रा. ब.नी अप्पाला मुद्दाम खिजविण्याच्या इराद्याने विचारलें, " काय अप्पा ! मग आता तूं वडगांवच्या शाळेचा राजीनामा देणार असशील ?"

" राजीनामा ! आणि तो कशाबद्दल ?" अप्पाने न समजल्यासारखें करून विचारलें.

रा. ब. या वेळीं चेष्टेच्या आणि विनोदाच्या ऐन रंगांत होते. प्रचलित चळवळीची चेष्टा करून त्यांना माझें मत तुरुंगवासाच्या मोहापासून परावृत्त करायचें होतें. तेव्हा मिस्किलपणाने हसून उपहासाच्या स्वरांत ते म्हणाले, " तुला माहीतच नाही का ? अरे, आता केवढी प्रचंड चळवळ होणार आहे ! अगदी अंतिम लढा बरं का ! क्रांतियुद्धाचे पडघम नि नगारेसुद्धा वाजायला लागले आहेत. अशा वेळीं युद्धांत भाग न घेतां तूं काय शाळेंतलीं चारदोन पोरं शिकवीत बसणार ? देशाशीं द्रोह करणार ?"

त्यांच्या भाषणाला कांही तरी उत्तर देणें अप्पाला भागच होतें. तो

म्हणाला, "पण चळवळींत भाग न घेणं म्हणजे देशद्रोह कसा होईल? तुरुंगांत जाणं म्हणजेच कांही देशसेवा होत नाही. देशाची सेवा बाहेर राहूनहि करतां येईल."

रा. ब. ना बरोबर मुद्दा सापडला. तरी सुद्धा ते चेष्टेच्या स्वरांत म्हणाले, "वा! बाहेर राहून कशी देशसेवा करतां येईल? हल्लीच्या युगांत तुरुंगांत गेले ते देशभक्त व न गेले ते देशद्रोही असा अगदी सरळ हिशोब आहे. यांच्या समजुतीप्रमाणं गोखले व रानडे हे सुद्धा देशद्रोही बरं का!"

थोडा वेळ जाऊं देऊन त्यांनी विचारलें, "म्हणजे तूं आमच्या शरदसारखा कॉंग्रेसमन नव्हेस तर?"

इतका वेळ कुसुम शांतपणें संभाषण ऐकत होती. पण आता ती गप्प बसणें शक्य नव्हतें. तिच्या देशप्रेमाचा व अप्पाविषयीच्या तिरस्काराचा एकदम स्फोट झाला. ती म्हणाली, "अप्पाच्या बाबतींत कसली आली आहे कॉंग्रेस नि नॉन्-कॉंग्रेस? या लोकांना का मतं असतात? का यांनी कधी विचार केलेला असतो? नुसते पोटापाण्याच्या मागं लागलेले लोक हे!"

कुसुमने इसकें वाक्ताडन केलें तरी अप्पा रागावला नाही. त्याने फक्त एकदा तिरस्काराच्या नजरेने कुसुमकडे बघितलें आणि तो बाह्यतः शांतपणाने म्हणाला, "खरं आहे कुसुमताई. आम्ही म्हणजे पोटासारख्या क्षुद्र वस्तूच्या पाठीमागं लागलेले लोक. आम्हांला राजकीय मतं असणार कशीं? तुम्हांला माहीतच आहे, की आमची शाळा म्युनिसिपालिटीच्या मालकीची. म्युनिसिपालिटींत ज्या पक्षाचं मताधिक्य असतं त्या पक्षाच्या मताचा मास्तरांना अंगीकार करावा लागतो. मागं कॉंग्रेसपक्ष जोरांत होता त्या वेळीं शाळेंतल्या तमाम मास्तरांनी गांधी टोप्या चढविल्या होत्या व त्यांतले एकदोन उत्साही शिक्षक तर साक्षरताप्रसाराची व हरिजनोद्धाराची अक्षत घेऊन खेडोपाडीं भटकत होते. आता काळ बदलला. म्युनिसिपालिटींत आता हिंदुसभेचं मताधिक्य आहे. मग मास्तर लोकांनी काय करायचं? त्यांनी गांधी टोप्यांना भगवा रंग दिला आणि घरांतील गांधींचे फोटो काढून तिथं सावरकराचे फोटो अडकवले. पोटासाठी सगळं करावं लागतं कुसुमताई."

अप्पा दुसऱ्याच दिवशीं वडगांवास चालता झाला. माझी प्रोफेसरी पुन्हा जोरांत सुरू झाली. चळवळीपासून माझें मन परावृत्त करण्याचा प्रयत्न रा. ब.

नी आता जवळ जवळ सोडूनच दिला होता. कॉंग्रेसच्या राजकारणाकडे माझें मनहि जास्त जास्त झुकूं लागलें होतें. एके दिवशीं जेव्हा मी नेहमीचा सूट न घालतां गांधी टोपी व नेहरू शर्ट घालून वर्गांत प्रवेश केला तेव्हा मुलांनी स्टॅंपिंगचा कडकडाट तर केलाच; पण मुलींनासुद्धा फार आश्चर्य वाटलें. कॉलेजांतील पहिल्या व दुसऱ्या वर्षांतील अल्लड व बालिश मुली त्या! कला, जीवन व संगीत या विषयांवर मोहक नि गुलगुलीत भाषेंत वादविवाद खेळायचें त्यांचें तें बालिश वय होतें. इतर कोणतीहि वेळ असती तर त्यांना माझ्यांतील या फरकाचें कांही विशेष वाटलें नसतें. पण देशांतील प्रक्षुब्ध राजकीय वातावरणामुळे त्यांच्यामध्ये सुद्धा फार बदल झाला होता. कुसुमच्या सांगण्यावरून मला कळलें, की माझ्या या वागणुकीमुळे कित्येक मुलींच्या मनोवृत्तीमध्ये फार फरक पडला होता. त्यांच्यापैकी कित्येकींनी आजच स्वदेशी वापरण्याच्या शपथा घेतल्या होत्या. त्यांच्यापैकी ज्या कवियित्री होत्या, त्यांनी यापुढे फक्त चळवळीवरच काव्य करण्याचें ठरविलें होतें आणि त्यांतल्या ज्या अत्यंत जहाल होत्या त्यांनी आजन्म अविवाहित राहून देश स्वतंत्र करण्याची घोर प्रतिज्ञा केली होती. हें ऐकून मला खरोखरच फार आनंद वाटला.

अखेर तो संस्मरणीय दिवस उगवला. ९ ऑगस्टला प्रातःकाळीं साम्राज्य-सरकारने कॉंग्रेसविरुद्ध दुसरी आघाडी उघडली व महात्मा गांधींना अटक करून समस्त हिंदी राजकीय चळवळीला आव्हान दिलें. मग चळवळीचा एकच भडका उडाला! ठिकठिकाणीं संप व मिरवणुकांची दंगल उडाली!

आमच्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी हरताळ पुकारून कॉलेजच्या प्रांगणांत झेंडावंदन केलें. मीं त्या सभेंत भाषण करून साम्राज्य-सरकारवर सडेतोड तोंडसुख घेतलें. टाळ्यांचा कडकडाट सारखा चालला होता. शेवटीं सभा उधळली गेली व मला पोलिसांनी धरून नेलें. पांचसात दिवसांनंतर खटला चालून मला सहा महिन्यांची 'अ' वर्गाची शिक्षाहि झाली.

माझ्या तुरुंगवासांतील त्या हालअपेष्टांचें वर्णन करण्याची माझी इच्छा नाही. बोलून चालून 'अ' वर्गाचे कैदी आम्ही. तुरुंग असा तो नव्हताच. घरचें अन्न, घरचे कपडे, निरानिराळ्या वर्तमानपत्रांचें वाचन, अनेक प्रसिद्ध व नामवंत पुढाऱ्यांबरोबर केलेली चर्चा, यामुळे माझा वेळ गमतींत जाई. काकू तर फराळाचें सामान इतकें पाठवीत, की त्याबद्दल पुढे पुढे माझी चेष्टाहि सुरू

झाली. कुसुम, कान्त आणि रा. ब. बहुधा महिन्यांतून एकदा येऊन मला भेटून जात. रा. ब. मला भेटायला तुरुंगांत येतील असें वाटलें नव्हतें. चळवळींत पडल्याबद्दल त्यांना माझा राग यावयास पाहिजे होता. पण तसें कांही झालें नाही. रा. ब. सारखीं माणसें मोठेपणाचीं व मानमान्यतेचीं पूजक असतात. तत्त्वांबद्दल विशेष प्रश्नच नसतो. रा. ब. चा एक पुतण्या किंग्ज कमिशन घेऊन सरकारी हुद्देदार झाला होता त्याचें जेवढें ते कौतुक करीत, तेवढेंच माझें करीत.

तुरुंगांतील सर्वांत मोठी करमणूक वर्तमानपत्रें वाचण्याची असे. दररोज सकाळीं वर्तमानपत्रें येत. महाराष्ट्रांतील निरानिराळया गावांतील चळवळींची बातमी त्यांत खच्चून भरलेली असे. त्या बातम्या वाचून चर्चा व वादविवाद करणें हा आमचा एक ठराविक कार्यक्रम होता.

पण या वर्तमानपत्रांतूनच एके दिवशीं मला आश्चर्यचकित करणारी बातमी कळली. त्या दिवशीं सकाळीं वर्तमानपत्रें वाचतांना माझ्या शेजारचे अप्पा-साहेब पटवर्धन एकदम उद्गारले, "अरे वा! आमच्या वडगांवमधेसुद्धा खूप दंगल उडाली आहे की! कालच रात्रीं एकंदर आठ-दहा लोकांना अटक झाली आहे!"

मीं सहज विचारलें, "वडगांवला? आणि एका रात्रीं इतक्या लोकांना अटक? आणि ती कशाबद्दल बुवा?"

मला सविस्तर उत्तर देण्याऐवजी पटवर्धनांनी वर्तमानपत्रच माझ्यापुढे केलें. मीं बातमी वाचली आणि मला जबरदस्त धक्का बसला! वडगांवला आज कित्येक दिवस चळवळीचा जोर होता. पोलिसांची नजर चुकवून गुप्त पत्रकें दररोज निघत होतीं व शाळांवर आणि दुकानांवर दररोजचेंच निरोधन सुरू होतें. शेवटीं, महादेवभाई देसाईंच्या निधनदिनाबद्दल प्रचंड दंगा झाला व पोलिसांनी अनेक विद्यार्थ्यांना व शिक्षकांना अटक केली. आश्चर्याची व दुःखाची गोष्ट म्हणजे अटक झालेल्या शिक्षकांत अप्पाचा नंबर होता.

ती बातमी वाचून मला फार आश्चर्य वाटलें! अप्पा आणि असल्या राजकीय भानगडींत? छे, विश्वासच बसेना माझा! मेलेल्या मनाचा एक तरुण म्हणून मी अप्पाला ओळखत होतों. त्याचा त्याबद्दल उपहाससुद्धा मी कमी करीत नसें. त्या अप्पानेसुद्धा चळवळींत पडावें? देशाकरिता त्यानेसुद्धा

त्याग करावा ? खरें सांगायचें म्हणजे मला ती कल्पना पसंत पडली नाही. माझ्या मोठेपणाला किंचित् तडा गेल्यासारखें मला वाटलें.

माझे तुरुंगवासाचे दिवस मात्र लवकर संपले. सहा महिन्यांचीच शिक्षा होती. आजूबाजूच्या लोकांच्या सहवासांत दिवस कसे गेले हें मला कळलें सुद्धा नाहीं. अखेर सुटकेचा दिवस उगवला. रानड्यांची मोटार तुरुंगाच्या दारांत सज्ज होती. माझी सुटका झाल्यानंतर आम्ही लगेच रानड्यांच्या बंगल्यावर गेलों. नंतरच्या दोनतीन दिवसांत फक्त महोत्सवच साजरा व्हायचा राहिला होता ! रा. ब. च्या मित्रांनी माझें भरमसाट कौतुक केलें. पोलिसांनी मला प्रथम पकडून नेल्यानंतर मला काय वाटलें, देशभक्तीचे आणि त्यागाचे रोमांच माझ्या अंगावर कितपत उभे राहिले, तुरुंगाचा प्रचंड दरवाजा म्हणजे मला काळपुरुषाच्या कराल नि कठोर दंष्ट्रा कशा वाटल्या व तुरुंगांत वेळ घालविण्याकरिता मीं काव्य कसें रचलें इत्यादि अद्‌भुतपूर्ण कथा श्रवण करण्याकरिता कुसुमच्या मैत्रिणी व कान्तचे मित्र दररोज येत. त्यांना तींच तींच वर्णनें सांगतांना माझें तोंड दुखून येई.

शेवटीं हवा पालटण्याकरिता मीं, कुसुम आणि काकू यांनी पांचगणीला जाण्याचें मुक्रर केलें. जाण्याच्या आदल्या दिवशीं घरीं मेजवानीचा बेत होता. फक्त निवडक लोकच बोलावले होते. रा. ब. चे मित्र कोणीच नव्हते. पण कुसुमच्या पांचसहा मैत्रिणी व कान्तचे मित्र यांच्या हसण्याखिदळण्याने व थट्टामस्करीने वातावरण फारच आनंदित झालें होतें. आमचा बिझिकचा डाव चालला होता. स्वयंपाकघरांत निरनिराळ्या पदार्थांचें तळण चाललें होतें. त्याचा सुवास जितडे तिकडे दरवळत होता. काकूंची स्वयंपाकघरांत देखरेख ठेवतां ठेवतां तारांबळ उडत होती. तिथल्या आरामखुर्चीत बसून निर्विकार-मुद्रेने टाइम्सचें वाचन करण्यांत मग्न असलेल्या रा. ब. ना आम्हां तरुण-तरुणींच्या संभाषणांत मन घातल्याशिवाय राहवत नव्हतें.

पण असले आनंदाचे प्रसंग फार वेळ टिकत नाहीत हेंच खरें. आमचें हसणें आणि खिदळणें जोरांत सुरू असतांनाच दारावरची विजेची घंटी जोराने खणखणली. ती बराच वेळ वाजत राहिल्यानंतर आमच्या लक्षांत आलें. कोणी कांही म्हणण्याच्या अगोदरच कुसुम दरवाजाकडे पळाली. तिची एक प्रिय मैत्रिण सिंधु परांजपे अजून यायची होती. ती आली असावी असें तिला

वाटलें. जातां जातां ती म्हणाली सुद्धा, "नेहमीं अस्सं आहे या सिंधूचं! कधी कुठं वेळेवर गेली तर शपथ! बरं झालं, पण आल्या तरी बाईसाहेब एकदाच्या!" या तिच्या बोलण्यांत मैत्रिणीविषयीचें लडिवाळ प्रेम दिसत होतें.

सिंधु परांजपे बरीच सुरेख होती. तिच्या सुरेखपणावर कान्तच्या मित्रांपैकी एकदोघे खूष असल्याचें सर्वांना माहीतच होतें. त्यामुळें आम्हां सर्वांच्या नजरा दरवाजाकडे लागल्या.

पण दार उघडतांच सर्वांनाच आश्चर्याचा धक्का बसला! कुसुमच्या चेहऱ्यावरचा आनंद संपून त्याची जागा तिरस्काराने घेतली. सर्वांचें हसणें-खिदळणें बंद झालें. रा. ब. सुद्धा आश्चर्याने दरवाजाकडे बघूं लागले. ती व्यक्ति सिंधु परांजपे नव्हती; तो अप्पा होता! त्याच्या आगमनाने आमच्या आनंदावर विरजण पडल्यासारखें झालें. आमच्यांत त्याला सामावून घ्यायला आम्ही तयार नव्हतों. तें शक्यच नव्हतें.

एखाद्या बधिर झालेल्या माणसासारखी त्याची मुद्रा होती. निर्जीव यंत्राप्रमाणे त्याची चाल होती. मानेवर उसवलेला व बाह्यांतून दोरे उसवलेला एक जुनाट कोट त्याने पेहेरला होता. खादीच्या मळक्या टोपींतून त्याचे उजव्या बाजूचे केस डोकावत होते. त्यांपैकी कांहींच्या कडा फारच भकास दिसत होत्या. त्याच निर्जीव चालीने तो आंत आला व एका खुर्चीवर बसला.

पांच मिनिटें गेलीं, दहा मिनिटें गेलीं, पण वातावरण अगदी शांत होतें. कांही तरी बोलायला पाहिजे म्हणून अप्पाच म्हणाला, "काय मंडळी! आज बेत दिसतोय् कसलातरी! काय प्रोग्रॅम आहे?"

त्याला जेव्हा रा. ब. कडून माझ्या तुरुंगवासाच्या अभिनंदनासाठीं तो मेजवानीचा थाट असल्याचें कळलें तेव्हा तो हसून म्हणाला, "ठीक! देशभक्ताचं असंच अभिनंदन व्हायला पाहिजे. अहो, तुरुंगांत जाऊन आलेल्याचं कौतुक करणं हीसुद्धा एक देशसेवाच आहे. आणि त्यांत तुम्ही सर्व गुंतलां आहांत यांतच आनंद आहे मला."

पण इतक्यांत मींच विचारलें, "अरे हो! पण तूं सुटलास केव्हा आणि कसा? तूं तर स्थानबद्ध होतास!"

सगळ्यांच्याच नजरा अप्पाकडे लागल्या.

" त्याचं असं आहे ! " अप्पा नेहमीच्या उपहासगर्भ आवाजांत म्हणाला, " हल्लीच्या दिवसांत स्थानबद्ध माणसाला तुरुंगांतून बाहेर येण्याला फक्त तीनच मार्ग आहेत. आजारी पडणं, पळून येणं, किंवा माफी मागणं. त्यांपैकी आजारी पडण्याइतका मी श्रीमंत नाही, पळून येण्याइतका दमहि माझ्या अंगांत नाही, तेव्हा..."

कुसुमने किंचित् उतावळीने विचारलें, " तूं माफी मागून सुटका करून घेतलीस ? असंच ना ? "

तिच्याकडे बिलकुल लक्ष न देतां आम्हां सर्वांकडे किंचित् अधिक्षेपाची नजर टाकून तो म्हणाला, " तेव्हा तुरुंगांतून सुटण्याकरिता मला तिसऱ्या मार्गाचा अवलंब करावा लागला व तो मीं केला."

अप्पाने माफी मागून सुटका करून घेतली याबद्दल सर्वांनाच त्याचा तिरस्कार वाटला ! एवढे प्रतिष्ठित रा. ब., की त्यांचा सर्व जन्म सरकारी नोकरी करण्यांत व खाविंदचरणीं विलीयमान होण्यांत गेला होता, त्यांना सुद्धा अप्पाचा राग आला होता. ते एकदम उसळून म्हणाले, " तूं— आणि माफी मागून तुरुंगांतून सुटून आलास ? कांही लाज कशी वाटत नाही तुला ? आपल्याला हें पसंत नाही. स्वतःच्या अंगांत कुवत नव्हती तर या भानगडींत पडायचं नाही. पण अगोदर तुरुंगांत जायचं नि नंतर माफी मागून परत यायचं— छे छे ! अगदी सहन होत नाही."

कान्तचे सारे मित्रहि फार रागावले. चळवळ सुरू असतांना ते लोक जिमखान्यावरील पॅव्हेलिन्‌मध्ये ब्रिजचे डाव टाकण्यांत आणि फावल्या वेळांत सिनेमा-नटींविषयी मोठ्या आत्मीयतेने चर्चा करण्यांत मग्न असत. त्यांना-सुद्धा अप्पाच्या भित्रेपणाचा राग आला. मग नेहमी राजकारणावर चर्चा करण्यांत व शब्दांचीं कारंजीं उडविण्यांत मग्न असणाऱ्या कुसुमला किती राग आला असेल ! ती एकदम उसळून म्हणाली, " या पळपुट्या वीराची किंमत मीं केव्हाच ओळखली होती. असल्या लोकांच्या हातून कधीच क्रांति होत नसते. पण आश्चर्य वाटतं तें हें, की असले लोक आपलीं काळीं तोंडं इतरांना दाखवितात तरी कशाला ? यांचं मुकावलोकन करण्यापेक्षा खरोखरच मरण पत्करलं."

ती इतकें बोलत आहे तों आंतून काकू जेवायला चलण्याची वर्दी घेऊन आल्या. सर्व लोक आंत जाण्यास सिद्ध झाले. अप्पाला कोणींच थांबण्यास सांगितलें नाहीं. तशी कोणाची इच्छाच नव्हती. शेवटीं तोच शांतपणें निघून गेला. जातांना तो म्हणाला, " तुम्हां देशभक्तांच्या मजलसींत भाग घेण्याची माझी लायकी नाहीं. तुम्ही विनाकारण..."

पण पुढे तो कांही तरी बोलणार इतक्यांत कुसुमने धाड्कन् दार लावलें. दार लावण्याच्या आवाजावरून कुसुमचा राग कुणासहि सहज कळून येण्यासारखा होता. तिची चर्या एखाद्या गुन्हेगाराला कडक शिक्षा देणाऱ्या न्यायदेवतेसारखी उग्र दिसत होती.

जेवतांना अप्पाच्या माफीचा विषय सर्वत्रांस पुरला. सर्वांच्या मतें अप्पा देशद्रोही आणि भ्याड होता. मी माझें मत बनवूं शकत नव्हतों. माझ्याइतकाच शिकलेला हा तरुण इतका देशद्रोही कसा होईल अशी मला शंका येई. पण दुसऱ्या दिवशीं अप्पाचें पत्रच माझ्या हातांत पडलें व त्यामुळे माझ्या शंकेचें पूर्णतया निरसन झालें. तें पत्र असें होतें—

" प्रिय शरद,

" तुला पत्र लिहिण्याचें हें माझें धाडस बघून तुला माझा मनस्वी राग येईल. कदाचित् एका देशद्रोह्याचें पत्र म्हणून तूं त्या पत्राला केराची टोपलीहि दाखवशील व कुसुमच्या सांगण्यावरून यापुढे तुला असलीं पत्रें येणार नाहीत असा कांही तरी नक्की बंदोबस्त करशील. तूं काय करावेंस हें सांगण्याचा माझा मानसहि नाही आणि अधिकार तर मुळीच नाही. तरीसुद्धा हें पत्र प्रथमपासून शेवटपर्यंत वाचण्याची व तुमच्यासारख्या देशभक्तांकडून 'भित्रा, पळपुटा व देशद्रोही' म्हणून शिक्का मारलेल्या एका सालस आणि प्रामाणिक माणसाचें अंतरंग समजावून घेण्याची मी तुला विनंती करतों.

" माझी नोकरी सुरू झाल्यानंतर साधारण दोनतीन महिन्यांनीच चळवळ सुरू झाली. त्याच्या आधी कित्येक दिवस महागाई व उपासमार या दोन आपत्तींनी आम्हां कनिष्ठवर्गीतील पांढरपेशांचें जीवन कमालीचें असह्य करून टाकलें होतें. कापडाच्या किंमतींतील भरमसाट वाढीमुळे जुन्या फाटक्या कोटाच्या जागीं नवीन कोट आणणें आम्हांस शक्य नव्हतें. दुधाचे भाव वाढल्यामुळे चहाच्या घोटाबरोबर जें दूध आमच्या पोटांत जाई तेंसुद्धा

हळूहळू कमी होऊं लागलें होतें. आणि धान्याची महर्घता इतक्या भयानक रीतीने वाढली होती, की आमच्या घरांतील चुली व शेगड्या कायमच्या विझून जातील की काय अशी साधार भीति आमच्या मनांत निर्माण झाली होती !

" अशाच परिस्थितींत चळवळ सुरू झाली. गांधीजींना पकडलें. ठिक-ठिकाणीं असंख्य निरपराध लोकांवर मशीनगन्सचा मारा झाला व देशांतील सर्व पूज्य नी वंदनीय पुढारी अटकेंत टाकले गेले. या गोष्टींचा माझ्या मना-वर परिणाम झाल्याशिवाय कसा राहील ? तुरुंगांत गेलेल्या व स्थानबद्ध असलेल्या देशभक्तांच्या वार्ता ऐकून माझ्या मनांतील सुप्त शक्ति प्रत्यहीं उचंबळून येत. पण मी काय करणार होतों ? मनाच्या अंतस्थ टोचणीला मी कोणतें समर्पक उत्तर देऊं शकणार होतों ?

" तुरुंगांतील हालअपेष्टांना मी भीत नव्हतों. दारिद्र्याची आणि उपास-मारीची सवय असणारा कोणताहि हिंदी नागरिक त्यांना भिणार नाही. पण तुरुंगाच्या चार भिंतींच्या आड स्वतःला गाडून घेऊन माझ्या घरच्या मंडळीं-च्या उपजीविकेची काय व्यवस्था ? नोकरीवर पोट असणाऱ्या माझ्या-सारख्या गरीब शाळामास्तराच्या आईने व पोरक्या भावंडांनी मीं तुरुंगांत गेल्यानंतर कोणाच्या तोंडाकडे पाहावें ?

" इतक्या सर्व अडचणी असूनसुद्धा मीं देशाच्या हाकेला धावून जाण्याचें ठरवलें. देशाकरिता आपण समरांगणांत उतरलों की आपल्या आईची व लहान असहाय्य भावंडांची काळजी मागे राहिलेले लोक घेतील— नव्हे त्यांनी घेतलीच पाहिजे— अशी माझी सार्थ अपेक्षा होती.

" पण ती अपेक्षा लवकरच फोल ठरली ! देशप्रेमाच्या प्रेरणेने जितक्या तन्मयतेने व आत्मीयतेने मीं चळवळींत उडी टाकली, तितकाच पश्चात्ताप मला थोड्याच दिवसांत वाटायला लागला.

" तुरुंगांत असतांना मला घरच्या माणसांच्या उपासमारीच्या दारुण हकीगती कळत. माझ्या ' देशभक्ती 'मुळे त्यांचें जीवन पिचत चाललें होतें. वाढत्या महागाईमुळे उपासमारीची सजा त्या सर्वांनाच सहन करावी लागत होती.

"या परिस्थितींतून बाहेर पडण्याकरिता मीं अनेकांच्या विनवण्या केल्या. खुद्द माझ्या आईने मदतीकरिता दाताच्या कण्या केल्या व धाकट्या भावंडांनी वाटेल तें काम करण्याची तयारी दर्शविली. पण व्यर्थ! एकाच्याहि हृदयास पाझर फुटला नाही.

"अशा परिस्थितींत मीं तुरुंगांत किती दिवस राहूं शकणार? शेवटीं मीं पूर्ण विचारान्ती तुरुंगांतून सुटका करून घेण्याचें– तोंडाला माफीचें काजळ फासून सुटका करून घेण्याचें– ठरविलें व त्याप्रमाणे केलेंहि.

"शरद, तुरुंगांत जाऊन आल्यामुळे तुझ्यापुढे पुढील आयुष्यांत कीर्तीचें आणि मानमान्यतेचें ताट वाढून ठेवलें आहे. चळवळ संपतांक्षणींच तुला कुठल्याहि कॉलेजांत प्रोफेसरची नोकरी अगदी हमखास मिळेल व सहा महिन्यांच्या तुरुंगवासाच्या बेगमीवर पुढील सर्व आयुष्य तुला व कुसुमला कीर्तीच्या प्रकाशांत सहज काढतां येईल. याच्या अगदी उलट माझी स्थिति होणार हें मला कळून चुकलें आहे. माफी मागणारा देशद्रोही म्हणून यापुढे तूं, कुसुम, रा. ब. आणि इतर लोक माझ्याकडे बोटें दाखविणार व माझा पाणउतारा करणार हें मला कळत का नाही? तुमच्या उपहासाची मला भीति वाटत नाही; पण माझ्या देशद्रोहाची जाहिरात आजूबाजूला करतांना तुम्ही इतकें तरी लक्षांत ठेवा, की माफी मागणारा अप्पा तर देशद्रोही खराच; पण तो तुरुंगांत गेल्यानंतर त्याच्या असहाय नातेवाइकास मदत न करणारे रा. ब., कुसुम, कान्त व त्यांच्या जातीचे इतरेजन हेसुद्धा तितकेच देशद्रोही होत.

"असो. यापेक्षा अधिक लिहिणें नलगे.

तुझा—**अप्पा**"